


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

संपादक : प्र०ना० परांजपे

संपादन-सल्लागार : अशोक रा० केळकर, कृष्ण श्री० अर्जुनवाडकर, आशा मुंडले, द०भि० कुलकर्णी, मॅक्सीन बर्नसन

संपादन-समिती : प्र०ना० परांजपे (प्रमुख), नीलिमा गुंडी, मृणालिनी शहा, विजय पाध्ये, आनंद काटीकर

कार्यकारी मंडळ सदस्य व पदाधिकारी : प्रा० प्र०ना० परांजपे, अध्यक्ष; डॉ० मृणालिनी शहा, प्रा० आनंद काटीकर, कार्यवाह, श्री० विजय पाध्ये, सहकार्यवाह; श्रीमती विजया चौधरी, कोषाध्यक्ष; डॉ०नीलिमा गुंडी, सदस्य; प्रा० रंजना फडके, सदस्य; डॉ० मॅक्सीन बर्नसन, सदस्य; डॉ० प्रभाकर जोशी, सदस्य; डॉ० प्रमोद तलगेरी, सदस्य (स्वीकृत); डॉ० मनोहर जाधव, सदस्य (स्वीकृत).

लेखन व परीक्षणार्थ पुस्तके पाठविण्याचा पत्ता : प्र०ना० परांजपे, सी-1, सुरजबन सहनिवास, गणेशखिंड मार्ग, पुणे 411 007.
स्थिरभाष : (020) 2569 4617 चलभाष : 94225 09638

प्रकाशक, मुद्रक, व्यवस्थापकीय पत्रव्यवहार व वर्गणी पाठविण्यासाठी पत्ता :
आनंद काटीकर, द्वारा, मृणालिनी शहा, 1, शीतल अपार्टमेंट्स, 46/4, एरंडवणे, पुणे 411 004. चलभाष : 94216 10704

मुद्रण-स्थळ : एम०आर० ॲण्ड कं०, सदाशिव पेठ, पुणे 411 030. दूरभाष : (020) 2447 5939

मराठी अभ्यास परिषदेच्या **www.marathiabhyasparishad.com** या संकेतस्थळाचे व्यवस्थापक : चित्तरंजन भट - 93731 04903 विजय पाध्ये - 98220 31963.

(१) वार्षिक वर्गणी भरण्यासाठी पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर असे आहे. जानेवारी २०१०पासून वार्षिक वर्गणी - विद्यार्थ्यांसाठी रु० ७५/-, व्यक्तींसाठी एका वर्षास रु० १००/-; पंचवार्षिक वर्गणी रु० ४५०/-, संस्थांसाठी एका वर्षास रु० १५०/-; पंचवार्षिक वर्गणी रु० ६५०/-.

(२) मराठी अभ्यास परिषदेची आजीव सदस्यत्व (फक्त व्यक्तींसाठी) वर्गणी रु० १,०००/- आणि नोंदणी शुल्क रु० १००/-. १ जानेवारी २०११पासून आजीव सदस्यत्व शुल्क रु० २०००/-. आजीव सदस्यांना 'पत्रिकेचा'चा अंक पाठवला जातो.

(३) पैसे भरण्याबद्दल सूचना : वर्गणी प्रत्यक्ष, रोखीने, किंवा धनादेशाने देता येईल. कृपया मनिऑर्डर पाठवू नये. (पाठवल्यास आपला पत्ता पिनकोड क्रमांकासह न विसरता लिहावा.) धनादेश 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. धनादेश पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास आणि 'ॲट पार' नसल्यास रकमेत रु० ५०/- वटणावळ अधिक घालावी. धनादेशासोबत आपले नाव, पत्ता, रक्कम, कोणत्या वर्षासाठी वर्गणी ते अवश्य लिहावे.

(४) जानेवारी २०१०पासून जाहिरातीसाठी दर : पूर्ण पान रु० ३,०००/-, अर्धे पान रु० २,०००/-, आवरण-पृष्ट (क्र० ४ = मलपृष्ठ) रु० ५,०००/-, विशेष रंगीत पृष्ट रु० १०,०००/-

प्रकाशन : त्रैमासिक : जानेवारी(हिवाळा), एप्रिल(उन्हाळा), जुलै(पावसाळा), ऑक्टोबर(दिवाळी)
सूचना : (१) पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या/लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच, असे नाही. (२) या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अनुदान मिळालेले आहे. तथापि या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी साहित्य संस्कृती मंडळ व राज्यशासन सहमत असतीलच असे नाही.

या अंकाची किंमत रु० २५/-

अनुक्रमणिका

अनेक वर्गणीदारांना व मराठी अभ्यास परिषदेच्या आजीव सदस्यांना 'भाषा आणि जीवन'चे अंक त्यांनी दिलेल्या पत्त्यावर रीतसर टपालाने पाठविले जात असूनही ते पोहोचत नाहीत, आणि त्यामुळे अंकाची प्रत पुन्हा पाठविण्याची पत्राद्वारे वा दूरभाषावरून विनंती केली जाते असे अलीकडे अनेक वेळा अनुभवाला आले आहे. वर्गणीदारांनी तसेच परिषदेच्या आजीव सदस्यांनी टपालाद्वारे आपल्याला पाठविण्यात आलेला अंक न मिळाल्यास त्याबाबत संबंधित टपाल कार्यालयाकडे लेखी तक्रार करून त्या तक्रारीच्या प्रतीवर टपाल कार्यालयाकडून रीतसर पोच घ्यावी व तिची एक प्रत परिषदेकडे पाठवावी अशी विनंती आहे. अशा प्रकारे टपाल कार्यालयाकडे केल्या गेलेल्या तक्रारीची प्रत परिषदेकडे आल्यास उपलब्ध अंकाची जादा प्रत पाठविणे शक्य होईल ह्याची कृपया नोंद घ्यावी.

## अनुक्रमणिका

## आवाहन

१. टपालाने पाठविलेल्या अंकांतील काही अंक गहाळ होतात हा नेहमीचा अनुभव आहे. शक्यतो अंक पुन्हा पाठविला जातो. पण जेव्हा या तक्रारींची संख्या जास्त असते तेव्हा अंक पुन्हा पाठवणेही कठीण होते. पुण्याच्या काही भागांतून - विशेषत: बिबवेवाडी, सिंहगड मार्ग - या भागांतून तक्रारी खूप येतात. यामुळे अंकाची प्रत व टपालखर्च असे दुहेरी नुकसान होते. म्हणून जे सभासद/ वर्गणीदार/कुरियर-सेवेचे वर्षाला रु० ४०/- पाठवतील त्यांना अंक कुरियर-सेवेने पाठविला जाईल. ही व्यवस्था हिवाळा २०११ (जानेवारी २०११) अंकापासून करण्यात येईल. कृपया याची नोंद घ्यावी.

२. वर्गणी मनिऑर्डरने पाठवू नये अशी मुद्रित सूचना देऊनही वर्गण्या मनिऑर्डरने येत राहतात आणि त्यामुळे बरीच गैरसोय व गैरसमज होतात. वर्गणी भरण्याचा सोपा मार्ग म्हणजे महाराष्ट्र बँकेच्या कुठल्याही शाखेत मराठी अभ्यास परिषदेच्या महाराष्ट्र बँकेतील (टिळक मार्ग शाखा, पुणे) बचत खाते क्र० 20057164260 या खात्यात वर्गणी भरणे व आमच्याकडे पैसे भरल्याचे चलन पाठवणे. चलनावर स्वत:चे नाव, पत्ता लिहिण्यास व चलनाची छायाप्रत स्वत:कडे ठेवण्यास विसरू नये.

---

## आदरांजली

- मराठी कवितेला कामगारसन्मुख करणारे आणि कवितेच्या भाषेला ठाम विधानप्रधान वक्तृत्वपूर्णतेचा साज चढविणारे कविवर्य नारायण सुर्वे
- कोकणीला मान्यता मिळवून देण्यात महत्वाची भूमिका बजाविलेले ज्ञानपीठ पुरस्काराने सन्मानित स्वातंत्र्यसैनिक रवींद्र केळेकर
- 'पत्रकारांसाठी मराठी'चे लेखक, महाराष्ट्रात वृत्तपत्र विद्येचा पाया घालणारे आणि मराठी अभ्यास परिषदेचे सभासद प्रा० ल०ना० गोखले
- मुंबई विद्यापीठातील अर्थशास्त्राचे निवृत्त प्राध्यापक, लेखक, कर्ते विचारवंत आणि मराठी अभ्यास परिषदेचे सभासद स०ह० देशपांडे

यांचे अलिकडे निधन झाले. त्यांना मराठी अभ्यास परिषद व भाषा आणि जीवन तर्फे आदरांजली वाहण्यात येत आहे.

---



अनुक्रमणिका

संपादकीय

# एकात्मिक भाषिक धोरण

**प्र०ना० परांजपे**

आधुनिक काळात एकराष्ट्र-एकभाषा किंवा एक राज्य - एक भाषा अशी स्थिती सहसा आढळणार नाही. प्रवास, व्यापार, राजनैतिक संबंध अशा अनेक कारणांनी एका राष्ट्रात अनेक भाषासमूह असतात आणि एका राष्ट्रात/राज्यात एकापेक्षा अधिक राजभाषा असतात. त्यामुळे राज्याचे भाषाविषयक धोरण एकाच भाषेपुरते मर्यादित असून चालत नाही. लोकव्यवहारातल्या भाषा, शिक्षण व्यवहारातल्या भाषा आणि राज्यव्यवहारातल्या भाषा यांची सद्यस्थिती काय आहे याचा वस्तुनिष्ठ अभ्यास करून त्यांना इष्ट अशा स्थितीकडे कसे न्यायचे याची उपाययोजना म्हणजे भाषाविषयक धोरण. ते एकात्मिक, सर्वसमावेशक आणि दीर्घकालीन असावे लागते. लोकशाही व्यवस्थेमध्ये ते कसे राबवायचे त्याची आखणी दूरदृष्टी ठेवून व दूरच्या पल्ल्याचे भान ठेवून करावी लागते. भाषिक धोरणाची इष्ट फळे लगेचच्या लगेच साध्य होण्यासारखी नसतात; शासकीय, शैक्षणिक इ० सर्व क्षेत्रांत आणि सार्वजनिक, खासगी अशा सर्व थरांवर ते धोरण समजूतदारपणाने, सर्व घटकांना सामावून घेऊन सर्वांच्या सहकार्याने राबवले तरच ती आवाक्यात येतात.

या पार्श्वभूमीवर महाराष्ट्र सरकारच्या भाषिक धोरणाबद्दल काय म्हणता येईल? पहिली गोष्ट म्हणजे 'धोरण' म्हणता येईल अशी काही दृष्टी किंवा असा कार्यक्रम सरकारकडे आहे असे दिसत नाही. सरकार जे काही करते ते तात्पुरत्या मलमपट्टीसारखे, वेळकाढूपणाचे असते. समित्या नेमणे, अकॅडेम्या स्थापन करणे, पारितोषिके देणे, अशा घोषणाकेंद्री उपायांनी समस्या सोडविण्यासाठी आपण काही करतो आहोत असा देखावा निर्माण करता येतो; पण समस्या मात्र सुटत नाहीत. शिवाय सरकारच्या उक्ती व कृतीतही एकवाक्यता नसते. किंबहुना त्या परस्परविरोधी आहेत याचेही भान सरकारला नसते.

अलीकडेच सरकारने एक भाषा सल्लागार समिती नेमली आहे पण तिने फक्त मराठी भाषेविषयीच सल्ला द्यावा अशी सरकारची अपेक्षा असावी. म्हणूनच तिच्या सभासदांत एकही भाषावैज्ञानिक नाही, मराठी वगळता इतर कोणत्याही भाषेचा तज्ज्ञ नाही. मराठी भाषेच्या विकासाचा मंत्र जपणाऱ्या मंत्र्यांना भाषेचा विकास म्हणजे वाङ्मयाचा विकास असे वाटते आणि मराठीच्या नावाने कुंकू लावणारे शासन

आज ना उद्या अनुदान द्यावे लागेल या भीतीने मराठी माध्यमाच्या नवीन शाळांना परवानगी नाकारते आहे आणि चालू असलेल्या शाळांचा गळा घोटते आहे! भाषा संचालनालय, राज्य मराठी विकास संस्था, साहित्य संस्कृती मंडळ अशा संस्थांची संचालक, अध्यक्ष इ० पदे महिनोन महिनेच काय वर्षानुवर्षे रिकामी राहतात; त्यांवर नेमणुका करण्याची तातडी सरकारला जाणवत नाही. आणि तरीही राज्याचे सांस्कृतिक धोरण, शैक्षणिक, धोरण, पर्यटनविषयक धोरण, क्रीडाविषयक धोरण आणि भाषाविषयक धोरण इ० ठरविण्यासाठी समित्या नेमण्याचे धोरण उत्साहाने अमलात आणले जात आहे.

वर उल्लेखिलेल्या संस्थांखेरीज भाषाविषयक कार्य करणाऱ्या इतरही अनेक संस्था व संघटना महाराष्ट्रात आहेत. विश्वकोश मंडळ आहे, हिंदी, उर्दू, गुजराती या भाषांच्या अकॅडेम्या आहेत, विद्यापीठांमध्ये भारतीय व परकीय भाषांचे विभाग आहेत, साहित्य महामंडळ व त्याच्या घटकसंस्था आहेत, विविध भाषांतल्या उत्कृष्ट पुस्तकांना पारितोषिके देण्याच्या योजना आहेत, पाठ्य पुस्तक मंडळ आहे. पण या सर्वांचा परस्परांशी काही संबंध आहे का? त्या सर्वांना मार्गदर्शक होईल असे काही धोरण आहे का? की अनुदानाचे वाटप केले की आपले कर्तव्य संपले असे सरकारला वाटते?

शिक्षणाच्या माध्यमाचा प्रश्न भाषाविषयक धोरणाचाच अविभाज्य भाग आहे. मराठी माध्यमाच्या शाळांना परवानगी नाकारून इंग्रजी माध्यमाच्या शाळांना मुक्तहस्ते परवानगी देण्याच्या धोरणामुळे पंचवीस-तीस वर्षांनी राज्याचा कारभार मराठीतून चालवणे अशक्य होऊन बसण्याची शक्यता आहे. १९५०मध्ये सातवीपर्यंतच्या शाळांतून इंग्रजी हा विषयच हद्दपार केल्याचा परिणाम म्हणून पन्नास वर्षांनी पहिलीपासून इंग्रजी शिकवण्याची वेळ सरकारवर आली. मराठी माध्यमाच्या नवीन शाळाच सुरू झाल्या नाहीत तर हजारोच काय लाखो गरीब मुलांचा शिक्षणाचा हक्कच हिरावून घेतला जाण्याची शक्यता आहे.

तात्पुरत्या डागडुजीच्या थातुरमातुर उपाययोजनांऐवजी आज गरज आहे, ती एकात्मिक सर्वंकष भाषिक धोरणाची. त्यात मराठी, इंग्रजी, हिंदी भाषांबरोबर माध्यम म्हणून आदिवासी भाषा, गुजराती, कन्नड, उर्दू या भाषांचाही विचार असेल, त्रिभाषासूत्राची दखल घेतली जाईल. संस्कृत, जर्मन, फ्रेंच इ० परकीय भाषांच्याही अभ्यासाचा विचार केला गेला असेल. दुकानांवरच्या पाट्या कुठल्या भाषेत असाव्यात, केंद्रीय आस्थापनांमध्ये मराठीचा वापर कसा होईल, अमराठी लोकांना मराठी शिकवण्यासाठी कुणी व काय करायला हवे, नोकरभरतीत मराठीच्या ज्ञानाची पूर्वअट असावी का, न्यायालयात मराठीचा वापर होण्यात,

विशेषत: उच्च न्यायालयात, कोणत्या अडचणी आहेत व त्या कशा दूर करता येतील, संगणकावरील मराठीच्या कळफलकाचे प्रमाणीकरण, मराठी साहित्याचे अन्य भारतीय व परकीय भाषांतील भाषांतर आणि त्या भाषांतील साहित्याचे मराठीत भाषांतर अशा सर्व गोष्टींचा उपलब्ध आर्थिक व मनुष्यबळ यांच्या मर्यादेत विचार करून प्राधान्यक्रम निश्चित केलेला असेल. थोडक्यात, महाराष्ट्रातील सर्व लोकांच्या भाषिक गरजा जाणून घेऊन त्या कशा पूर्ण करता येतील हे सांगणारे भाषिक धोरण आपल्याला हवे आहे; केवळ घोषणाबाजी करणारे नव्हे! ■

.... शिक्षणव्यवस्थेने आता उद्योगाचे स्वरूप धारण केले आहे. एकीकडे सक्तीचे शिक्षण, मोफत शिक्षण, आठवीपर्यंत परीक्षाच नाही, मोफत पोषण आहार अशा घोषणाच घोषणा सुरू आहेत, तर दुसरीकडे सामान्य माणसाला शिक्षण घेताच येऊ नये अशी बाजारी परिस्थिती निर्माण केली आहे. ज्याच्याजवळ प्रचंड पैसा आहे त्यालाच नोकरी, तुमच्याजवळ पैसा नाही, तर शिक्षणही नाही आणि नोकरीही नाही.

अशातच सरकारी शाळा ओस पाडून खाजगी शाळांचे दुकानदार तेजीत आले आहेत. जिथे तिथे इंग्रजी शाळा. इंग्रजी शाळेत जाणाऱ्यालाच जगात जागा आहे, अशा जाहिरातीतून मुलाला मातृभाषेतून तोडून त्याचे शिक्षण त्याची विचार प्रक्रिया, त्याचे व्यक्तिमत्व नीट घडू नये, याची खबरदारी घेतली जात आहे!

या साऱ्याचा परिपाक म्हणून मातृभाषेविषयीची अनास्था प्रचंड प्रमाणावर वाढत आहे. भाषा संपली, तर संस्कृती संपते याचा विसर साऱ्यांनाच पडत चालला आहे. दुसऱ्या बाजूला भाषेचाच वापर राजकारणासाठी केला जातो आहे. या कोलाहलात मराठी भाषेबाबत गंभीर स्थिती निर्माण झाली आहे. त्या भाषेवर ज्यांचे पोट चालते ते लोक मराठी वाढावी, मराठी ज्ञानभाषा व्हावी म्हणून कोणतेही काम करत नाहीत. महाराष्ट्रातल्या विद्यापीठांतील मराठी विभागांमध्ये चाललेल्या संशोधनाची शीर्षके जरी वाचली तरी तेथील कामाचा आणि मराठीच्या आस्थेचा संबंध उरला आहे का, हे ध्यानात येईल.

- राजन गवस

'आपले वाङ्मयवृत्त', ऑगस्ट २०१०, पृष्ठ १५

# टीकेविना !

**भाषावार्ता - १**

तामिळनाडू सरकारने कोईमतूर येथे झालेल्या तमिळ भाषेच्या जागतिक परिषदेसाठी साडेतीन हजार कोटी रुपये खर्च केले. त्यापैकी नव्या प्रकारचे ज्ञान तमिळमध्ये आणण्यासाठी १०० कोटी तर उच्च न्यायालयात या भाषेचा वापर व्हावा यासाठीच्या तयारीसाठी ३०० कोटी रुपयांची तरतूद करण्यात आली आहे.

■

**भाषावार्ता - २**

मराठीसाठी स्वतंत्र खाते निर्माण करण्याचा निर्णय महाराष्ट्र सरकारने घेतला असून त्यासाठी १० (दहा) कोटी रुपयांची भरभक्कम तरतूद केली आहे.

■

**भाषावार्ता - ३**

पुढील २५ वर्षांचे मराठीचे धोरण ठरविणे व त्या अनुषंगाने शासनाला मार्गदर्शन करण्यासाठी महाराष्ट्र शासनाने भाषा सल्लागार समितीची पुनर्रचना केली असून त्यात पुढील तज्ज्ञांचा समावेश केला आहे. न्या० नरेंद्र चपळगावकर (अध्यक्ष), दत्ता भगत, सदानंद मोरे, वसंत आबाजी डहाके, रंगनाथ पठारे, हरी नरके, विश्‍वनाथ शिंदे, सूर्यनारायण रणसुभे, सतीश काळसेकर, लक्ष्मण गायकवाड, संजय गवाणे, वीणा देव, लक्ष्मीकांत तांबोळी, रमेश वरखेडे, विलास खोले, प्रल्हाद लुलेकर, माधवी वैद्य, प्रमोद मुनघाटे, राजन गवस, श्रीकांत तिडके, संजय पवार.

भाषा संचालक समितीचे सदस्य सचिव असतील. शिवाय पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शालेय शिक्षण विभाग, उच्च व तांत्रिक शिक्षण विभाग २, सामान्य प्रशासन विभाग यांचे सचिवही समितीचे सभासद असतील.

समितीच्या कार्यात भाषा संचालनालयाने प्रकाशित केलेल्या कोशांत सुधारणा करणे, नवीन प्रचलित शब्दांचा त्यात समावेश करणे, मराठी पारिभाषिक शब्दांच्या समस्या सोडवणे, मराठी भाषेच्या अभिवृद्धीसाठी कार्यक्रम आखणे इत्यादींचा समावेश करण्यात आला आहे.

■



अनुक्रमणिका

# भाषा : एक संघर्षाचा इतिहास

गो०पु० देशपांडे

प्रथमच एक खुलासा केला पाहिजे. मी भाषाशास्त्री किंवा वैय्याकरणी नाही. मला काय म्हणायचे आहे हे ह्या शीर्षकामुळे स्थूलमानाने लक्षात यावे. त्यापेक्षा ते फार अर्थपूर्ण नाही. मी वैय्याकरणी नाही हे जरी खरे असले तर मी काय म्हणतो आहे याचा व्याकरणाशी संबंध आहेच. व्याकरणाविषयी नाही म्हटले तरी एक सर्वसाधारण भीती असतेच! कविता कोणाला कळत नाही (किंवा कळणार नाही) ह्यासंबंधी क्षेमेंद्र त्याच्या काव्यकंठाभरणात म्हणतो, 'यस्तु प्रकृत्याश्मसमान एव, कष्टेन वा व्याकरणेन नष्टाः।' म्हणजे जो निसर्गतःच दगडासारखा आहे किंवा ज्याची रसिकता किंवा जाणकारपणा अति कष्टांमुळे किंवा व्याकरणामुळे नष्ट झालेला आहे (त्याला काव्य कळणे मुश्किल!).

व्याकरणाचा संबंध भाषेशी पोहचतो. आणि विशेषतः भाषेतील बरेच प्रश्न व्याकरणाशी जाऊन भिडतात. एक वादंग १९ व्या शतकापासून सुरू आहे तो म्हणजे शुद्ध भाषा आणि अशुद्ध भाषा ह्यांतला. तसाच दुसरा वादंग म्हणजे प्रमाण-भाषा आणि अप्रमाण-भाषा ह्यांतला. आणि ही जी दोन बायनरी आपोझिटस् (binary opposites) आहेत ती एकमेकांपासून अगदी निराळी आहेत, हे ध्यानात घेतले पाहिजे.

एका प्रकारे भाषा शुद्धही असत नाही आणि अशुद्धही असत नाही. भाषा असते! हे मी जे बोलतो किंवा दुसरं कोणी बोलतंय ते शुद्धच असतं. माणसे बोलतात ते/त्याच्यामध्ये अशुद्ध हे ठरवता येत नाही. मग अशुद्ध काय हे जर ठरवता येत नसेल तर मग शुद्ध काय हे तरी कसे ठरवणार? हा शुद्ध-अशुद्ध भेद एक प्रकारे चुकीचाच आहे. अमुक एक शब्द शुद्ध किंवा अशुद्ध कसा ह्याची काही मीमांसा मिळत नाही. मग कसं ठरवायचं, अमुक एक शब्द शुद्ध किंवा अशुद्ध कसा? त्याचं मी तुम्हांला साधं उदाहरण देतो. ते उदाहरण असं आहे की मराठीमध्ये 'मी' हे सर्वनाम दोन विभक्त्यांत वापरलं जातं. विभक्ती हा शब्द तुमच्या कानावर पडला असेल असे मी गृहीत धरतो. एक प्रथमा विभक्तीत आणि एक तृतीया विभक्तीत. म्हणजे 'मी पुस्तक आणले' हा 'मी' हा तृतीया विभक्तीतला आहे. आणि 'मी' जातो हा 'मी' हा प्रथमा विभक्तीतला आहे. आता ह्या प्रथमा विभक्तीत व तृतीया विभक्तीमध्ये ग्रामीण मराठीत स्पष्ट फरक आहे, 'मी' आणि 'म्या' ह्या दोन वापरांत तो दिसून येतो. ह्या 'म्या'चं नशीब इतकं वाईट आहे की आता उलटी चूक

सुरू झाली आहे. आता निरनिराळ्या गोष्टींमध्ये, नाटकांमध्ये, सिनेमांमध्ये, ग्रामीण मनुष्य 'मी' म्हणतच नाही अशी काहीतरी समजूत झालेली दिसते. ग्रामीण मनुष्य 'मी' म्हणत असतो. खरं म्हणजे तो फक्त विशिष्ट परिस्थितीमध्ये 'म्या' म्हणतो, विशिष्ट विभक्तीत 'म्या' म्हणत असतो. पण हा ग्रामीण मी आता प्रत्येकजण, तुम्ही कुठलीही टीव्ही सीरियल काढून बघितली तर तिच्यामध्ये एखादंतरी ग्रामीण पात्र असतं सांधारणपणे, ते जर असलं तर हटकून 'कोण आहे?' ह्या प्रश्नाचं उत्तर 'म्या' असे येते. प्रत्यक्षात असे ग्रामीण मराठीत कोणी म्हणत नाही. 'म्या' शब्द ज्ञानेश्वरीत आढळतो. 'म्या' अशुद्ध ठरवलं तर ज्ञानदेवाचं मराठी हे अशुद्ध मराठी म्हणायची पाळी येते. 'म्या' अशुद्ध का? तर ते प्रथमा विभक्तीतला 'मी' आणि तृतीया विभक्तीतला 'मी' ह्यांतला फरक न कळल्यामुळे, तो घोटाळा होतो. थोडक्यात 'म्या' जास्त व्याकरणबरहुकुम आहे. 'न' चा 'ण' करणं किंवा 'ण' चा 'न' करणं हे शुद्ध-अशुद्धतेचं एक लक्षण मानलं जातं. म्हणजे 'पाणी' हे शुद्ध आणि 'पानी' हे अशुद्ध. 'पान' शुद्ध. मग तो न शुद्ध आहे आणि हा अशुद्ध आहे. का? काही कारण नाही. म्हणजे भाषाशास्त्रीय किंवा वैय्याकरणी कारण त्याला नाही असा माझ्या म्हणण्याचा अर्थ आहे. आणि मग त्यामुळे होतं काय की 'ण'चा 'न' झाला की अशुद्ध असं जर आपण मानलं तर तुम्हांला ... बरं पुन्हा दुसरा एक समज असा आहे की अशुद्ध मराठी हे ग्रामीण मराठी असतं. आणि नागर-मराठी हे शुद्ध मराठी असतं. किंवा उच्चवर्णीय मराठी हे शुद्ध मराठी असतं, इतरांचं मराठी हे अशुद्ध असतं, असं आपण समजून चाललो आहोत आणि त्यामुळे 'ण' चं 'न' झालं की ते अशुद्ध आहे असं आपल्याला वाटतं. मोरोपंत म्हणजे ह्याच्यासारखा सनातनी ब्राह्मण आढळायचा नाही. आता नामदेवाचा गौरव करताना, मोरोपंतांनी नामदेवासंबंधी एका ठिकाणी म्हटले आहे, 'नारदमुनीचे सुमहतकृत्य तेची नामदेवाचे, याणे प्रसिद्ध केले विठ्ठल भव्य नाम देवाचे.' विष्णुशास्त्री चिपळूणकरांनी जो शब्द अशुद्ध ठरविला असता आणि आज जो शब्द अशुद्ध मानला जातो तो शब्द किंवा शब्दरूप मोरोपंत वापरतात. ते 'याणे' म्हणतात, ते 'याने' म्हणत नाहीत. ज्याला आपण शुद्ध मराठी आज म्हणू त्याच्यामध्ये मोरोपंतही गेला. आतापर्यंत दोन ब्राह्मणांची उदाहरणे आपण दिली. एक ज्ञानेश्वर आणि आता मोरोपंत. एक पंडिती परंपरेतला, एक संत परंपरेतला. दोघांनाही मराठी येत नव्हतं असा त्याचा अर्थ होतो काय? म्हणजे मला असं म्हणायचं आहे की शुद्ध-अशुद्धतेचं जे प्रकरण आहे ते मला तरी अतार्किक वाटतं. फार तर एवढंच म्हणता येईल की आता जो नागर लेखक आहे तो जेव्हा 'म्या' वापरतो तो वापर बऱ्याचदा अशुद्ध असतो. कारण तो विभक्तीतला भेद विचारात घेत नाही. आता प्रथमा विभक्तीतील 'मी'

आणि तृतीया विभक्तीतील 'मी' ह्यांतला फरक त्याला कळतच नाही. त्यामुळे तो सगळीकडेच 'म्या' म्हणायला लागला, वगैरे वगैरे.

थोडक्यात, होतं काय की शुद्ध-अशुद्धतेचा मामला शुद्ध-अशुद्धतेचा मामला केव्हा होतो? जर असं सिद्ध करता आलं की जे व्याकरण आजचं आहे आणि जी भाषा बोलली जाते त्या भाषेचा आवाका घेऊन लिहिलेलं जे व्याकरण आहे, ते व्याकरण जर असेल तर त्या व्याकरणाच्या अनुरोधाने आपल्याला भाषा शुद्ध का अशुद्ध हे ठरवता येईल. आता तुम्हांला आणखी मजेदार उदाहरण देतो. १९व्या शतकामध्ये उदाहरणार्थ पहिलं व्याकरण घडलं. तुम्हांला ब्रिटिशपूर्व काळात मराठीमध्ये विरामचिन्हे दिसत नाहीत. तुम्हांला फक्त पूर्णविराम म्हणजे दंड दिसतो. कविता लिहिली असेल त्या चरणाच्या शेवटी दंड असायचा, श्लोक पूर्ण झाला की शेवटच्या चरणाच्या उजव्या बाजूला दोन दंड असायचे. तेसुद्धा विरामचिन्हे म्हणून येत नव्हते - तो एक श्लोक संपला किंवा अर्धा श्लोक संपला, अर्धा चरण संपला हे दाखवण्यासाठी तो दंड असे. पण ते जर वगळलं तर अर्धविराम, स्वल्पविराम तर नव्हतेच. अपूर्णविराम हे अमुक अमुक कोलनचं भाषांतर आहे आणि 'सेमीकोलन' म्हणजे अर्धविराम. म्हणजे हे शब्दसुद्धा भाषांतरित आहेत. म्हणजे ज्या मंडळींचं पंक्चुएशन जेमतेम शंभर वर्षांचे आहे ती मंडळी सगळ्या ऊर्वरित मराठी जनतेचं मराठी हे शुद्धाशुद्ध ठरवू लागली. हा संघर्षाचा भाग आहे. मोरो केशव दामल्यांचं मराठीतलं पहिलं प्रसिद्ध व्याकरण आहे. तसंच व्याकरण चीनमध्ये त्याच सुमारास १९व्या शतकाच्या शेवटी शेवटी किंवा २०व्या शतकाच्या आरंभी लिहिलं गेलं. त्या पुस्तकाची शताब्दी साजरी झाली चीनमध्ये. पहिलं आधुनिक व्याकरणाचं पुस्तक! त्यानिमित्तानं लेख आले होते. तर त्याच्यावरती एक परीक्षण त्या वेळेला प्रसिद्ध झालेलं होतं. त्या परीक्षणाचा रोख असा होता की हे व्याकरण 'शास्त्रीय' म्हणता येत नाही. फार तर त्याला 'गलामर्ले' असं म्हणता येईल. 'गलामर्ले' हे 'ग्रामर'चे अपभ्रष्ट रूप. एरवी चिनीमध्ये व्याकरणास 'यू (भाषा) फा (पद्धती)' असे म्हणतात. पण हा शब्द त्या पुस्तकाच्या बाबतीत वापरता येत नाही हा इत्यर्थ. परीक्षणात म्हटले होते, 'हे काय पुस्तक आहे आणि इंग्रजांची नक्कल कशाकरता करायची, काय इंग्रजांना कळतं व्याकरणातलं?' असा प्रश्न त्याच्यामध्ये विचारला आहे आणि असं म्हटलं आहे की, ह्या भाषेची गंमत बघा, एक माणूस - वन मॅन असतो, तर वन मॅन आणि वीस असले तर मात्र मेन! काय जरूर? जर २० आहे तर उघडच जास्त आहेत. तर तो a बदलून e करायची जरूरच काय? ते तर्कदुष्ट आहे. त्यांच्याकडे व्याकरण ते तसं शिकतात. आता गंमत बघा अशी - हा आरोप चिनी लेखकांनी केला.

राजवाड्यांनी एके ठिकाणी नेमका असाच तर्कवाद केलेला आहे. त्यांनी ते चिनी पुस्तक वाचलेलं असणं शक्य नव्हतं. राजवाडे काय म्हणतात? राजवाडे असं म्हणतात की अहो काय हे व्याकरण आहे? एक पुरुष आणि वीस पुरुष म्हणून मराठीत चालतं. वीस पुरुष झाले की म्हणे ह्याचं पुरुषाचं स्पेलिंग बदलतं. हा आरोप राजवाड्यांनी केला. थोडक्यात सांगायचं म्हणजे हे व्याकरण एक प्रकारे कलोनियल एक्स्पिरियन्सचा भाग आहे. हा शुद्ध-अशुद्धतेचा जो भाग आहे हा निव्वळ वार्णिक आहे सगळा. अर्थातच वार्णिक आहे पण वार्णिकसुद्धा, निव्वळ वार्णिक नव्हे, ते कलोनियल आहे. कलोनियल आणि वार्णिक अशी उभयपक्षी शुद्ध-अशुद्धतेची कल्पना निर्माण झाली, जेव्हा जेव्हा भाषेचा विचार होतो. म्हणजे दोन संघर्ष हे निश्चित आहेत. एक संघर्ष असा आला जो आंतर्वर्णीय होता आणि दुसरा संघर्ष जो आला तो व्यवस्थात्मक, आंतरराष्ट्रीय व्यवस्थात्मक. साधारणपणे मध्ययुगात युरोपात किंवा अगदी १८-१९व्या शतकापर्यंत इंग्रजी ही व्हर्नाक्युलर समजली जात होती. आणि ग्रीक आणि लॅटिन ह्या खऱ्या क्लासिकल भाषा. उरलेल्या युरोपीय भाषा ह्या व्हर्नाक्युलरच आहेत. कॉलनायझेशनने काय केलं तर ही रिलेशनशिपच बदलली. आणि युरोपीय भाषा ह्या क्लासिकल झाल्या आता आणि भारतीय भाषा ह्या व्हर्नाक्युलर झाल्या. म्हणजेच भाषेमधला; म्हणजे हे जे त्या कॉलनायझेशनच्या संबंधित आपण बोलत असल्यामुळे, संघर्षावरून एक गोष्ट निश्चितपणे सिद्ध होते ती म्हणजे कुठल्याही प्रकारचा रॅडिकॅलिझम जसा निव्वळ वार्णिक असून चालत नाही, त्याचप्रमाणे तो निव्वळ साम्राज्यवादाच्या विरोधीही असून चालणार नाही. तो वार्णिक आहे इथपर्यंत आम्हां लोकांची खात्री पटलेली आहे पण तो अजून साम्राज्यवादविरोधी आहे हे लोकांच्या लक्षात आलेलं नाही. तसं पुरेसं लेखन झालेलं दिसत नाही.

मराठीचाच विचार करायचा झाला तर आपण दोन विरोध बघितले. उच्चवर्णीय/उच्चवर्णीयांची उच्चारपद्धती व इतरांची उच्चारपद्धती हा एक आणि दुसरा प्रमाण-अप्रमाण ह्यांतला विरोध. ह्याचा अर्थ असा की शुद्ध-अशुद्धतेचा प्रश्न आणि प्रमाण-अप्रमाणाचा प्रश्न हे दोन विरोध भिन्न आहेत. महत्त्वाची गोष्ट अशी की शुद्धाशुद्धतेचा निर्णय महत्त्वाचा नाही. प्रमाण/अप्रमाण हा निर्णय महत्त्वाचा असतो. व्याकरणाच्या आधारे हा निर्णय करायचा तर व्याकरण त्यासंबंधी काही मांडणी करताना दिसत नाही. काय चुकीचं आणि काय नाही हे ठरवायचं त्यासंबंधी व्याकरण फारशी थिअरी तुम्हांला देऊ शकत नाही, हे महत्त्वाचे आहे. ज्या काळात व्याकरण-विचार जिवंत होता तेव्हा व्याकरण अशी मांडणी करू शकत होते. त्यांतले एक उदाहरण द्यायचे तर शब्दाचा अर्थ कसा निर्माण होतो ह्यासंबंधीचे देता

येईल. ते म्हणजे, शब्द हा स्वतंत्रपणे त्याला अर्थ असतो का. एका वैय्याकरणीने म्हटल्याप्रमाणे शब्दाला अर्थ नसतो. शब्द हा प्रकरणशः अर्थपूर्ण असतो. तो कुठेतरी जाऊन बसतो तेव्हाच त्याला अर्थ येतो. नाहीतर डिक्शनरी मीनिंग असते. शब्दकोशात जो अर्थ आहे त्या लेक्सिकॉनमध्ये त्यांनी ते अर्थ लावलेले असतात, पण तिथे १७ अर्थ असतात, ५० अर्थ असतात. पण परत शब्दाला अर्थ काय तर काही नाही! शब्द हा एकाच वेळेला बहुअर्थाचा, बहुआयामी आणि निरर्थक असा दोन्ही असतो. निरर्थक अशासाठी असतो की त्याचे जे १७ किंवा ५० अर्थ असतात, ज्या वाक्यावर तुम्ही अडकलेले असता त्यात सगळे अर्थ लागत नसतात. मग काय लागतं आपल्याला? तर आपल्या असं लक्षात येतं की हा जो शब्द आहे, वाक्यात तो कुठे आहे ह्याच्यावर त्याचा अर्थ अवलंबून असतो. ह्याचं मी तुम्हांला हास्यास्पद उदाहरण देतो. त्याने मुद्दा सिद्ध होतो. ते उदाहरण असं आहे : तुम्ही जर पुण्याहून मुंबईला एक्स्प्रेसवेने गेलात तर प्रत्येक ठिकाणी, म्हणजे म०न०से०ला बरं वाटावं इतक्या मराठी पाट्या आहेत. मलासुद्धा बर वाटलं. पण त्याच्यात आता गंमत काय आहे बघा. त्यांच्यात प्रत्येक ठिकाणी लिहिलेलं आहे की - 'बोगदा पुढे आहे' लिहायला पाहिजे 'पुढे बोगदा आहे'! आता पुढे बोगदा आहे म्हणजे इट्स अ वॉर्निंग, की अरे बाबा पुढे बोगदा आहे, पुढे लक्ष ठेव. बोगदा पुढे आहे हे केव्हा म्हणू आपण? लहान मूल विचारतंय, ''आई बोगदा कुठेय, बोगदा कुठेय?'' त्याचं उत्तर आहे 'बोगदा पुढे आहे'. पुढे कुठे ठेवता यावर त्याचा अर्थ आहे, हे उघड आहे. हे हास्यास्पद उदाहरण अशाकरता दिलं की भाषाशास्त्राचे प्रश्न किती सोपे असतात ते बघा! भाषेविषयी बोलणं सुखाचं तेवढ्यासाठी असतं, अतिशय सोपं असतं. तर थोडक्यात 'पुढे आहे' ह्याचा अर्थ कशामुळे सिद्ध झाला? तर तो प्रकरणशः सिद्ध झाला. प्रकरणशः अशाने सिद्ध झाला की ते प्रकरण आहे, एका प्रकारे, की तुम्ही निघालेले आहात, डाव्या बाजूला तुम्ही वॉर्निंग वाचलीत. त्यानंतर असं वाटायला लागलं की बोगदा पुढे आहे - कुठेतरी चुकलं, पुढे बोगदा आहे हे बरोबर आहे. बोगदा पुढे आहे चा अर्थ त्याला अभिप्रेत नाही तो होतो. आणि 'पुढे बोगदा आहे' असं म्हटलं तर त्याला अभिप्रेत आहे तो अर्थ होतो. तर प्रकरणशः शब्दाचे अर्थ असतात. आता त्याच्याशी जोडलेला आणखी एक भाग सांगतो. ह्या सगळ्याचा अर्थ कसा लावायचा हे बघा हं तुम्ही, मला सुचेल तसा मी मांडतोय. आता काय आहे की एक वाद शंकराचार्यांनी मांडला. एक गोष्ट नेहमी लक्षात ठेवावी की या सगळ्या सनातनी ब्राह्मणांवरती, आचार्यांवरती टीका करणारे अनेक लोक भेटतात. सगळ्यांचं शांतपणे ऐकून घ्यावं. परंतु ह्या आचार्यांना कशी अक्कल नव्हती असे म्हणाल तर अवस्था 'टु थ्रो बेबी विथ द बाथवॉटर' असं व्हायचं. संपूर्ण





अनुक्रमणिका

तत्त्वज्ञान टाकून देता येत नाही. इंटलेक्चुअल हिस्ट्री, आपली आपल्याला टाकून द्यायची नाही. संघर्ष, तुम्हांला तुमचा बौद्धिक इतिहास संपूर्ण माहीत असल्याशिवाय करता येत नाही म्हणून हा व्याप करायचा. शंकराचार्यांनी एक प्रश्न निर्माण केलाय, ज्याचं शंकराचार्यांनी उत्तर दिलेलं नाही. तो प्रश्न असा आहे की त्यांनी दोन वादांचा उल्लेख केला आहे. त्यात रास्त कोणता? एक दृष्टी-सृष्टी वाद आणि दुसरा सृष्टी-दृष्टी वाद. आता सृष्टी-दृष्टी वाद असे म्हणतो की जी सृष्टी (मटीरियल वर्ल्ड) कळल्यामुळे मला दृष्टी प्राप्त होते, त्याच्यामुळे मला दिसतं आणि दृष्टी-सृष्टी वाद जो आहे तो म्हणतो मला दिसतं म्हणून सृष्टी आहे. सृष्टी-दृष्टी वाद म्हणतो सृष्टी आहे म्हणून मला दिसतं. आता याच्यातलं खरं कोणतं? शंकराचार्य चतुर असल्यामुळे त्यांनी स्पष्ट उत्तर दिलेलं नाही. ते फक्त भेद करतात व तुमच्यापुढे मांडतात. भाषेमधले जे बरेचसे वादंग आहेत ते असेच आहेत. तुम्ही तुमच्या दृष्टीनी सृष्टी जेव्हा ठरवता तेव्हा शुद्ध व्याकरणाच्या मागे लागता आणि सृष्टीने जेव्हा दृष्टी ठरते तेव्हा शुद्ध व्याकरणाच्या मागे तुम्ही जात नसता. मग तुम्हांला 'पानी' किंवा 'म्या' अशुद्ध वाटणार नाही. कारण तुम्ही सृष्टी मान्य करता. सृष्टी मान्य करता म्हणजे सृष्टीवरून तुमची दृष्टी ठरवता आणि मग ती दृष्टी तशी ठरत असल्यामुळे तुम्हांला 'पानी' हा शब्द गैर वाटत नाही किंवा मोरोपंत जेव्हा 'याणे' म्हणतो तेव्हा ते आपल्याला खटकत नाही. दृष्टी-सृष्टी वाद आणि सृष्टी-दृष्टी वाद आहेत हे ध्यानात घेतले की भाषेमधले अंतर्गत संघर्ष कळतात.

आता पुढचा मुद्दा. तो असा आहे की भाषिक संघर्ष असं आपण जेव्हा म्हणतो तेव्हा आपल्याला नेमकं काय अभिप्रेत आहे? सांस्कृतिक संघर्ष काय किंवा भाषिक संघर्ष काय हे जर नीट समजावून घ्यायचे असतील तर ज्या समाजामध्ये हे संघर्ष आहेत तो सबंध समाज हा एकक (युनिट) मानावा लागतो. तो जर युनिट नसेल तर त्याची चर्चा करण्याचं काही कारणच नाही... म्हणजे दोन विरुद्ध फौजा एका तिसऱ्याच जमिनीसाठी भांडतायत एवढाच त्याचा अर्थ होईल. का हे संघर्ष तयार होतात? तर अशासाठी की ते एकक, ती युनिटी, त्या युनिटीमध्ये कॉन्ट्रॅडिक्शन आहे. थोडक्यात एका संस्कृतीतील एककात तो विरोध नसेल तर मग तो कॉन्ट्रॅडिक्शन म्हणून स्वीकारताच येत नाही. किंबहुना ती कॉन्ट्रॅडिक्शन राहतच नाही. मग तुम्ही तुमचं बोला, आम्ही आमच बोलतो. संपलं! पण तसं नसतं. एकमेकांचं साहित्य हे एकमेकांचं नाही असं म्हणणाऱ्या लोकांनासुद्धा साहित्य हे एक मानावं लागतं. बराचसा रॅडिकल विचार महाराष्ट्रामधला हा असा उलट्या दिशेने चालला आहे. कालपरवापर्यंत या रॅडिकॅलिझममुळे काय प्रश्न निर्माण झाले होते? की रॅडिकॅलिझम हा मुळामध्ये स्वीकारार्ह आहे का नाही? आता प्रश्न असा





अनुक्रमणिका

आहे, तुम्ही जर मराठी एक मानतच नसाल, ही साहित्य-परंपरा एक मानतच नसाल तर कसलं कॉन्ट्रॅडिक्शन आणि कोणाबरोबर कॉन्ट्रॅडिक्शन? नुसता वेळ घालवाल चर्चा करण्यात. त्यामुळे माझं म्हणणं असं आहे की ते एकक म्हणून मान्य करावं लागतं. दुसरं उदाहरण देऊन सांगायचं तर, दुसऱ्या पद्धतीने मांडायचं झालं तर, तुम्हांला एकाच कालखंडामध्ये दोन्ही प्रवृत्ती दिसतात. म्हणजे कसं, की तुम्ही एकदा असा विचार करा, संत कवी आणि पंत कवी - पंडित कवी. आता ह्यांचा जर आपण अंमळ विचार केला तर पंडित कवींचं मराठी म्हणजे मोरोपंतांचं मराठी उदाहरणार्थ किंवा वामनपंडितांचं मराठी, हे वामनपंडितांचं मराठी आणि चोखामेळाचं मराठी याचा एकाअर्थी काहीही संबंध नाही. त्या भाषा भिन्न वाटतात पण त्याचबरोबर ही गोष्टही खरी आहे की आपण असं मानलं की मोरोपंत हा ब्राह्मण होता आणि चोखामेळा हा महार होता म्हणून ती भिन्न आहेत, असं जर आपण मानलं तर अडचण अशी होते की ज्ञानेश्वरांचं मराठी आणि चोखामेळाचं मराठी ही इतकी दूर नाहीयेत. संत कविता ही आपल्याला एकसंध अशी पुष्कळ प्रमाणात बघता येते. तशा पद्धतीनं पंडित-कविता आणि संत-कविता ही एकसंध बघता येत नाही. कोणाचंही - अगदी ब्राह्मण ज्ञानेश्वरांचं मराठी आणि ब्राह्मण मोरोपंतांचं मराठी याचा काहीही संबंध नाही असे दिसून येते.

वामन पंडिताने गीतेचा समश्लोकी अनुवाद केला. मोठी कॉमेंटरी त्याच्यावर लिहिलेली आहे. ती का लिहिली? 'यथार्थदीपिका' असं त्यांनी गीतेवर लिहिलेल्या पुस्तकाचं नाव आहे. का लिहिलं? तर उत्तर असे की ज्ञानदेवाने ज्ञानेश्वरी लिहून घोटाळा केला आहे, त्याला गीतेचा अर्थ काही कळलेला नाही. त्यामुळे आता गीता काय म्हणतीय ते यथार्थ सांगतो म्हणून त्याने यथार्थदीपिका लिहिली. पण त्याने तेवढंच केलं नाही, त्याने ती समश्लोकी लिहिली. गीतेमध्ये दुसऱ्या अध्यायामध्ये एक श्लोक आहे. तो असा आहे की, आत्म्याचं वर्णन चाललेलं आहे. 'य एनं वेत्ति हन्तारं यश्चैनं मन्यते हतं । उभौ तौ न विजानीतौ नायं हन्ति न हन्यते ॥'. ज्याला असं वाटतं की हा आत्मा मारतो किंवा ज्याला असं वाटतं की तो मारला जाऊ शकतो, 'उभौ तौ न विजानीतौ' दोघांनाही हे कळत नाही की आत्मा हा मरतही नसतो आणि मारतही नसतो, असा त्या दुसऱ्या अध्यायातल्या श्लोकाचा अर्थ आहे/भाषांतर आहे. आता वामनपंडितांनी त्याचा समश्लोकी अनुवाद केला आहे तो बघण्याजोगा आहे. काय म्हटले आहे त्या अनुवादात? 'भेदवादी म्हणे मारी, चार्वाक म्हणती मरे, दोघेही नेणती आत्मा ना हा मारी ना हा मरे.' आता ह्यात चार्वाकाला आणायची काय गरज होती? दोन तीन गोष्टी यातून सिद्ध होतात. एक म्हणजे असं की महाराष्ट्रात १६व्या शतकापर्यंत चार्वाक होते, पश्चिम महाराष्ट्रात,

हा त्याचा एक अर्थ लावता येतो. आणि ही जी अब्राह्मणी दर्शनं होती ती बऱ्यापैकी बळकट होती. बौद्ध तर होतेच. १७व्या शतकापर्यंत निश्चित ॲक्टिव्ह होते. एक-दुसरा तुरळक बौद्ध होता अशातला भाग नव्हे, ॲक्टिव्ह होते बौद्ध. वामनपंडिताला ह्या सगळ्याचा अंदाज असेलच की! नाहीतर नुसतं भाषांतर करण्यात तो कशाला वेळ घालवील? कुणीही नुसतं भाषांतर देत नसतं. काहीतरी मांडायचं असतं म्हणून भाषांतर करायचं असतं मुदलात. त्यासाठी जी जी ॲडजस्टमेंट करावी लागेल ती ती करायची. गीतेमधलं अगदी किरकोळ उदाहरण आहे, पण लक्षात ठेवण्याजोगं आहे. त्यांची भाषांतरं काय केलेली दिसतात की त्यांच्यामध्ये असं आहे का की अवतार ही कल्पना जी आहे ती कशासाठी आहे? कृष्ण भूतलावरती पुन:पुन: अवतार घेऊन येतो. याचं कारण मी अनेक गोष्टी करतो, अभ्युत्थानाय धर्मस्य आणि वगैरे वगैरे सगळं करतो. पण मुख्य गोष्ट अशी आहे की 'विनाशाय च दुष्कृताम्!' दुष्ट आणि खल पुरुष जे आहेत त्यांचा निकाल लावण्यासाठी मी उभा आहे. आता याचं भाषांतर विनोबांनी केलं आहे. त्यांनीही समश्लोकी लिहिली. त्याचा अनुवाद करताना विनोबा भावे असं म्हणतात की 'दुष्टा दूर करावया', 'विनाश' नाही. बदलला गीतेचा अर्थ. कारण काय आहे की गांधींच्या अहिंसेमध्ये ते त्यांना बसवायचं होतं. म्हणजे थोडक्यात काय, तर जे आपण वाचतो आणि जे मांडतो ते राजकीय दृष्ट्या शुद्ध असत नाही. कधी ते अशुद्ध असतं आणि असायला पाहिजे. माझ्याकडे तुम्ही येत असाल तर माझ्या भूमिका ऐकायलाच या नाहीतर येऊ नका, हा त्याचा अर्थ होतो. अगदी बरोबर आहे. भाषिक संघर्ष तेवढ्यासाठीच असतात. आत्मा मारतो म्हणजे काय? तर 'भस्मीभूतस्य देहस्य पुनरागमनं कुत:' चार्वाकाने विचारले होते की ज्या देहाची राख झाली तो कशाला परत यायला बसलाय... तो देह? म्हणजेच आत्मा मरतो, देहात्मभाव म्हणजे देह हाच आत्मा, तो अविनाशी नाही असे चार्वाकाला म्हणायचे होते. आत्मा मरतो हे वाक्य गीतेमधून मराठीत आणणे हा फक्त माझा हेतू नव्हता, आत्मा मरतो कारण जे मरतो असं म्हणतात ते चार्वाक त्यांना परब्रह्म सत्य कळलेलंच नाही, मला ते सत्य कळलेलं आहे. म्हणजे कोणाला? अद्वैत वेदांत्याला! भाषेतील संघर्षांना एक दार्शनिक परिमाण असते. त्यात स्वाभाविकपणे तीव्र विरोध असतात. त्यामुळेच कदाचित विरोध करायचा आणि विनाश करायचा ह्यांतला फरक कळेनासा होतो. संस्कृती हा एकक आहे. त्याचे ॲनाहिलेशन योग्य नाही, शक्यच नाही! ज्यांचे ॲनाहिलेशन करायचे अशा पुष्कळच गोष्टी असतात. पण त्यात समग्र संस्कृती बसत नाही. तसे करू गेले तर इतिहासाचे आणि संस्कृतीचे प्रवाहित्व हरवते. सामाजिक जीवनातला जिवंतपणा नाहीसा होईल.





अनुक्रमणिका

युरोपमध्ये वर्गसंघर्षाने कधीच संस्कृतीच्या विनाशाचा मार्ग चोखाळला नाही म्हणूनच ते समाज आज उभे आहेत. इतिहास जिवंत ठेवावेच लागतात. शब्दांचे अर्थ इतिहासाशिवाय लावता येत नाहीत. म्हणूनही इतिहास-विनाशाचा मार्ग टाळून, इतिहासाविषयी समीक्षात्मक दृष्टिकोण बाळगून सगळे इतिहास आपले (ॲप्रोप्रिएट) करून टाकावे लागतात. बरेच वेळा, इतिहास कसे लिहिले जातात ह्यावरही हा व्यवहार अवलंबून असतो. काँट्रडिक्शन समजून न घेता काँट्रडिक्शनच कॉन्फ्लिक्ट किंवा कन्फ्रंटेशन समजून वाटा चुकतात. इतिहास लिहिणारे लोक त्या त्या वेळी त्यांना जे महत्त्वाचे वाटले तेवढ्याचीच नोंद ठेवतात. पण ते लिहिणे जास्त समावेशक करणे हा काँट्रडिक्शनचा मार्ग झाला. जे लिहिलं गेलं आहे ते सगळं फेकून द्या म्हणणं हा कन्फ्रंटेशनचा मार्ग झाला. उदाहरणार्थ : १८४३ साली मराठीत पहिलं नाटक लिहिलं गेलं की नाही? पंचाईतच आहे की काय म्हणायचं? विष्णुदास भाव्यांनी १८४३ साली आपलं पाहिलं नाटक लिहिलं. रंगभूमीवर आलेलं हे नाटक, नाटक नव्हतंच असं म्हणण्यासाठी त्याची उकल मात्र कोणी केल्याची माझ्या पाहण्यात नाही. त्याचं टेक्स्चुअल अनॅलिसिस करायला पाहिजे. मग काय म्हणायचं? विष्णुदास भावे हे पहिले नाटककार आहेत का यावर वादंग सुरू आहेत. किंवा मुकुंदराज हे आद्य कवी आहेत का? त्यांना आद्य कवी म्हणता येईल का? असा काहींना प्रश्न पडलाय. थोडक्यात, 'आद्य कवीची जागा रिकामी आहे', 'मराठीच्या आद्य नाटककराची जागाही रिकामी आहे', अशी मांडणी विद्रोहाची नसून विनाशाची आहे! ह्यानं कुठल्याही प्रकारे सांस्कृतिक चळवळ पुढे जात नाही असं माझं मत आहे. हे करणारे निव्वळ विरोधी असतात असं नाही. विष्णुदास भाव्यांना बाजूला ठेवणारे पहिले पु०ग० सहस्रबुद्धे होते. त्यांच्यालेखी मराठी नाटक किर्लोस्करांपासून १८८० साली सुरू झालं. सारांश, तीन वेगवेगळ्या मार्गांनी जाऊन तीन आद्य नाटककार आपल्या हाती लागतात. एका मार्गाने विष्णुदास भावे तर दुसऱ्या मार्गाने जोतिबा फुले, आणि तिसऱ्या मार्गाने किर्लोस्कर. ज्याला जे योग्य वाटेल ते त्यांनी म्हणावे. परंतु उरलेल्या दोघांना यादीतून काढा असे म्हणणे हा इतिहासदृष्टीचा अभाव आहे. भाषिक किंवा वाङ्मयीन इतिहासाच्या काही अडचणींची उदाहरणे दिली. पण सर्व मांडणे इथे शक्य नाही. ह्या सर्व अडचणी महाराष्ट्राच्या विशिष्ट सामाजिक परिस्थितीमधून निर्माण झालेल्या आहेत. आणि त्यात मी सुचवल्याप्रमाणे वार्णिक संघर्ष आणि वासाहतिक (वसाहतवादाविरुद्धचा लढा) हे दोन लढे एकमेकांत गुंतलेले दिसतात. हे ध्यानात आले म्हणजे मग इतिहासाच्या मांडणीला खरी सुरुवात करता येईल. हे जोवर होत नाही तोवर विनाश आणि विरोध, वर्ण आणि वर्ग ह्या जंजाळात भाषेचे आणि संस्कृतीचे इतिहास अडकून पडतील किंबहुना पडलेच आहेत.



अनुक्रमणिका

(१७ मार्च २०१० रोजी चित्रबोली, संस्कृती आणि माध्यमे संवाद केंद्र, पुणे यांनी आयोजित केलेल्या व्याख्यानाची संहिता)

■

बी 10, अथश्री, फेज 1, बाणेर, लिंक रोड,
पाषाण, पुणे 411 021
स्थिरभाष : (020) 2586 3256, चलभाष : 098906 87085

## प्रवाही जाणीव

कलेत ही प्रवाही जाणीव अत्यावश्यक आहे. तिच्यातूनच कलेच्या नव्या वाटा फुटतात. या प्रवाही जाणिवेबद्दल थोडे स्पष्टीकरण. साहित्य म्हणजे काय, कशाकशाला साहित्य म्हणायचे हा फार मोठा प्रश्न आहे. वाचन करताना त्याचे एक अंधूक उत्तर आपल्या मनात असते आणि ते काही प्रमाणात स्थिरावलेले असते. वाचनक्रियेत त्यात सूक्ष्म बदल होत असतात. तरी काही कित्ते मनात घोळत असतात. या कित्त्यांच्या अवतीभवती जे घुटमळते त्यालाच आपण साहित्य मानतो. त्यानुसार साहित्यव्यवहार करतो. त्यानुसार पुस्तके, मासिके छापली जातात. प्रस्थापित साहित्य यातूनच निघते. कित्ते हे सोयीस्कर नमुने आहेत. त्यात अडकून राहायचे नाही. त्यांच्यापेक्षा काही अगदी वेगळे समोर आले तर कुतूहलाने त्याकडे पाहणे, त्याची ओळख करून घेणे, त्याला सामोरे जाणे आणि त्याचा अनुभव जर सच्चा असेल तर आपली व्याख्या बदलून घेणे ही प्रवाही जाणीव. ती निर्मात्याला असणे आवश्यक आहे. तसेच रसिकाला असणे आवश्यक आहे. कित्त्याबाहेरचे हे समर्थ नमुनेच साहित्यात बदल घडवून आणतात. त्यातले काही मूलगामी आणि दीर्घायुषी असतात. तर काही बुडबुड्यासारखे वरवरचे आणि अल्पायुषी असतात. चित्रपट त्याच्या निर्मितीच्या आसपासच्या काळात पाहिल्यानंतर 'याला काय चित्रपट म्हणायचे?' असे विचारणारा थिजलेल्या जाणिवेचा प्रेक्षक होता. 'अरेच्या, चित्रपट असाही असू शकतो!' असे म्हणणारा प्रेक्षक हा प्रवाही जाणिवेचा होता.

अरुण खोपकर
प्रस्तावना, 'वाचणाऱ्याची रोजनिशी'





अनुक्रमणिका

# मराठीच्या प्रश्नांचा ऐतिहासिक मागोवा

र०बा० मंचरकर

### १) आव्हान आणि प्रतिसाद

कोणत्याही समाजाचे आदर्श, त्याची मूल्ये आणि जीवनशैली त्याच्या भाषेमध्ये ग्रथित झालेली असते. ती भाषा ती बोलणाऱ्या समाजाचा जीवनाकडे पाहण्याचा दृष्टिकोण व्यक्त करीत असते. त्या समाजाची जीवनसरणी त्याच्या भाषेतून प्रकट होत असते. याचा अर्थ असा की एखादी भाषा वापरणे म्हणजे त्या भाषेचा समाजाच्या दृष्टीने आणि शैलीने जीवनव्यवहाराला प्रतिसाद देणे असते. त्यामुळे मातृभाषेचे ज्ञान हे केवळ स्वत:च्या भाषेचे ज्ञान नसते. ते माणसाला आपल्या संस्कृतीच्या गाभ्यापर्यंत घेऊन जाते, अवतीभवतीच्या जीवनाशी जोडते. पायाखालच्या मातीत त्याची मुळे घट्ट रुजविते. झाड जसे मातीत रुजते तसे माणसाचे आणि समाजाचे व्यक्तित्व त्याच्या भाषेत रुजून वर येते.

जो समाज आपल्या भाषेपासून तुटतो तो आपल्या संस्कृतीपासूनही दुरावतो. त्याचे स्वत्व त्याला पारखे होते. अशा समाजाचे भवितव्य अंधारमय असते, असा आजवर इतिहासाचा दाखला आहे.

मराठी भाषा व संस्कृती यांविषयी अशी एक धास्ती मराठी माणसाला सतत वाटत आलेली आहे. कोणीतरी आपल्या भाषेवर आक्रमण करतेय असे त्याला नेहमी वाटत आले आहे. दुसऱ्या बाजूला संस्कृत किंवा इंग्रजी यांचा आधार सोडला तर मराठी स्वतंत्रपणे काय करू शकेल याविषयी त्याला पुरेसा विश्वास वाटत नाही. त्यामुळे गेल्या हजार-अकराशे वर्षांपासून मराठीच्या भवितव्याची वेळोवेळी चिंता व्यक्त केली गेली आहे. आजही तीच चिंता आपण करीत आहोत.

संपूर्ण जगाचा इतिहास दहा खंडात लिहिणाऱ्या टाइनबीने त्या इतिहासाचे सूत्र सांगितले आहे ते 'चॅलेंज अँड रिस्पॉन्स', आव्हान आणि प्रतिसाद. कोणत्याही समाजासमोर काही आव्हाने असतात; काही प्रश्न असतात. तो समाज त्या आव्हानांना कसा सामोरा जातो, त्यांना कसा प्रतिसाद देतो, आपल्यासमोरच्या प्रश्नांची कशी सोडवणूक करतो, हे पाहावे लागते. त्यातून आव्हाने आणि प्रतिसाद, प्रश्न आणि उत्तरे यांचा एक आलेख काढता येतो. असा आलेख म्हणजे त्या समाजाचा इतिहास होय. मराठीच्या इतिहासातून मराठीच्या आजच्या प्रश्नांविषयी काही दिशादर्शक उत्तरे मिळतात काय; हे पाहण्याचा प्रयत्न येथे करावयाचा आहे.

वर्तमान पुष्कळ वेळा भूतकाळातून प्रेरणा घेतो आणि भविष्याला समृद्ध करतो. या धारणेने मराठीच्या आजच्या प्रश्नांची इतिहासाने दिलेली उत्तरे येथे पाहावयाची आहेत.

**२) मध्ययुगाचा प्रतिसाद**

मराठीला नेहमीच इतर भाषांचा काच सहन करावा लागला; अगदी महाराष्ट्रातही तिला दुय्यम स्थानावर राहावे लागले; ही एक ऐतिहासिक वस्तुस्थिती आहे. मराठी माणसाची धर्मभाषा काल संस्कृत होती आणि आजही संस्कृतच आहे. आपली कालची ज्ञानभाषा संस्कृत होती तर आजची ज्ञानभाषा इंग्रजी आहे. आपली कालची राजभाषा फारसी किंवा इंग्रजी होती तर आजची राष्ट्रभाषा तत्त्वत: हिंदी आणि व्यवहारातः इंग्रजी आहे. आज तत्त्वतः मराठी राजभाषा असली तरी प्रत्यक्ष जीवनात व्यवहारभाषा किंवा लोकभाषा यापेक्षा तिचे स्थान फारसे वेगळे नाही. याबाबतीत मराठीच्या भूतकालीन आणि वर्तमानकालीन प्रश्नांचे स्वरूप काहीसे सारखे दिसते. तेव्हा मराठी संतांनी व राजपुरुषांनी हा प्रश्न कसा सोडवला हे पाहणे उद्‌बोधक होईल.

संतांनी मराठीविषयीचा न्यूनगंड झटकून टाकला. मायबोलीचा गौरव करताना ज्ञानदेवांच्या वाणीला आत्मविश्वासाचा फुंद चढतो. मराठी बोल अमृतालाही पैजेवर जिंकणारे आहेत. या भाषेत 'साहित्यसोनियाच्या खाणी' उघडता येतील आणि 'ब्रह्मविद्येचा सुकाळ' करता येईल, असा त्यांचा विश्वास होता. आपले हे 'प्रतिज्ञोत्तर' त्यांनी खरे करून दाखविले.

तैसे भागवत प्राकृत जाले
परी नाही चुकले निजज्ञाना

असे एकनाथांनी आत्मविश्वासाने सांगितले आहे. ही टीका मराठी असली तरी 'ज्ञानदाने लाठी' असल्याची त्यांची खात्री होती. आपली चोखडी मराठी परब्रह्माच्या फळांनी लगडलेली आहे. आपले बोल स्वानंदसुखाने ओलावलेले आहेत. ते अमृताला फोल करतात, असे एकनाथांनी मोठ्या आत्मविश्वासाने म्हटले आहे.

मराठीची अस्मिता जागविताना संस्कृतच्या श्रेष्ठतेचे दडपण त्यांनी आपल्यावर येऊ दिले नाही. संस्कृतचे दडपण त्यांनी झुगारून दिले. ही गोष्ट ज्ञानदेवांनी अन्वयमुखाने साधली तर एकनाथांनी खंडनमंडनाने साधली. नाथांचे भांडण संस्कृतशी नव्हते. संस्कृतविषयी त्यांना पूर्ण आदर होता. त्यांचे भांडण होते ते मराठीला तुच्छ मानणाऱ्यांशी, तिचा द्वेष करणाऱ्यांशी! संस्कृतच्या ज्ञानाच्या

बळावर सामान्य माणसाची अडवणूक आणि पिळवणूक करणाऱ्यांशी त्यांचे भांडण होते.

⁂ संस्कृत ग्रंथकर्ते ते महाकवी
मा प्राकृतीं काय उणीवी? - एकनाथी भागवत १।१२३

⁂ कपिलेचें म्हणावें क्षीर
मा इतरांचे तें काय नीर? - एकनाथी भागवत १।१२४

⁂ संस्कृत वाणी देवें केली
तरी प्राकृत काय चोरापासोनी जाली? - एकनाथी भागवत १।१२९

एकनाथांनी हडसून खडसून विचारलेल्या अशा प्रश्नांमध्ये निरुत्तर करणाऱ्या युक्तिवादाचे सामर्थ्य आणि आत्मविश्वासाचे तेज आहे.

संस्कृत वापरण्याची क्षमता असूनही त्यांनी माध्यम म्हणून संस्कृतचा वापर करण्याचे टाळले. केसोबासांनी 'उद्धरण' सूत्रे संस्कृतमध्ये गुंफण्याची संमती मागितली तेव्हा 'नको गा केशवदेया: येणें माझिया म्हातारिया नागवतील :' (स्मृतिस्थळ १५) अशा शब्दांत नागदेवाचार्यांनी त्यांना परावृत्त केले. संस्कृत हीच ज्ञानभाषा राहिली तर स्त्री-शूद्र ज्ञानापासून वंचित राहतील अशी त्यांना भीती होती. पंचमहाकाव्याच्या धर्तीवर संस्कृत महाकाव्य लिहावे, हा पाध्यांचा आग्रह मोरोपंतांनी मानला नाही. विदग्ध वळणाची कविता मराठीतही लिहिता येते हे त्यांच्यासारख्या पंडित कवींनी दाखवून दिले.

संस्कृतमध्ये अथांग ज्ञानभांडार होते. पण संस्कृत शिकण्याचा अधिकार नाकारलेल्या लोकांना त्या ज्ञानापर्यंत नेणे शक्य नव्हते. तेव्हा ज्ञानच लोकांपर्यंत नेणे भाग होते. संस्कृतच्या उंच तटातून वाहणाऱ्या ज्ञानगंगेचा जनसामान्यांना लाभ व्हावयाचा तर मराठी शब्दरूपी पायऱ्यांचा घाट बांधणे आवश्यक होते. (ज्ञानेश्वरी ११।९). मराठी संतांनी संस्कृतचे ज्ञानभांडार स्वयंप्रज्ञेने उजळलेल्या स्वरूपात मराठीत आणले. 'मऱ्हाटाचि बोलू कवतुके' अशा लडिवाळपणाने त्यांनी मराठीची कास धरली. ब्रह्मविद्येचा सुकाळू करून त्यांनी जनसामान्यांच्या कळवळ्याने मराठीला ज्ञानभाषेचा दर्जा प्राप्त करून दिला.

संस्कृत की मराठी यांतून त्यांनी मराठीची निवड केली ती लोकसंवादासाठी होय. पण त्यांच्या दृष्टीने हा प्रश्न केवळ भाषिक नव्हता. तो ग्रांथिक ज्ञान आणि अंत:प्रतीत ज्ञान त्यांच्या निवडीचाही प्रश्न होता. लोकजीवनाशी संबंध तुटल्यामुळे संस्कृतातून लिहिणारे मध्ययुगातील मराठी विद्वान चर्वितचर्वणापलीकडे जाऊ शकत नव्हते. 'बोलिलेचि बोलावे । शिजविलेचि शिजवावे' अशी त्यांच्या ज्ञानाची

अवस्था होती. अशा वेळी ग्रंथप्रामाण्याच्या साचेबंद चाकोरीतून ज्ञानाला मुक्त करण्याची गरज होती. तेव्हा ग्रंथप्रामाण्यापेक्षा अनुभवाला, अंत:प्रमाणाला महत्त्व देण्याची बंडखोरी मराठी संतांनी दाखविली. त्यामुळे त्यांच्या अंत:स्फूर्त अभंगकाव्यातून आत्मप्रतीचा रसरशीत अनुभव येतो.

मराठीतच त्यांनी स्वतंत्र आणि मौलिक अशा ज्ञानाची निर्मिती केली. त्यामुळे मराठी ग्रंथांची संस्कृत भाषांतरे परप्रांतीयांसाठी झाली. 'अमृतानुभवा'चे संस्कृत भाषांतर करवून तो वाचण्याची निकड काशीच्या पंडितांनाही जाणवली.

गुजराती चक्रधरांनी मराठीला धर्मभाषा बनविले. त्यांची मराठी धर्मसूत्रे समजून घेण्यासाठी बंगाली, हिंदी, तमीळ, तेलगू आणि कन्नड महानुभावांना मराठी शिकण्याची गरज निर्माण झाली. अशा नव्या ज्ञानाने संतांनी मराठीला समृद्ध केले.

संतांच्या बरोबरीने राजांनीही मराठीचा कैवार घेतला. इस्लामी सत्तेबरोबर फारसी केवळ राजभाषाच बनली नाही तर लोकजीवनातही शिरली. '''अर्ज'दारांच्या 'फिर्यादी' 'काजी'पुढे जाऊन त्यांचा 'फैसला' किंवा 'इन्साफ' होऊ लागला. पत्रांबदली 'कागद' आले. अधिकाऱ्यांचे 'मोकादम' झाले आणि त्यांना मिळणाऱ्या वार्षिक वेतनाऐवजी 'सालिना मुशाहिरा' मिळण्याचा 'सिलसिला' पडला!'' (वि०ल० भावे, 'महाराष्ट्र-सारस्वत' १९६३, पृ०१६३) 'राज्यव्यवहारकोशा'-सारखे उपक्रम करून श्रीशिवछत्रपतींनी फारसीचे हे आक्रमण मोडून काढले. याविषयी इ०स० १५७७ ते १६७७ या काळातील ऐतिहासिक पत्रव्यवहारांचे विश्लेषण करून इतिहासाचार्य वि०का० राजवाडे यांनी आपले निरीक्षण नोंदविले आहे. शिवरायांच्या जन्मापूर्वी राजकीय पत्रव्यवहारात दर शंभर शब्दांमध्ये शहाऐंशी फारसी शब्द असत तर अवघे चौदा शब्द मराठी असत. हे प्रमाण इ०स० १६२८चे आहे. शिवराज्याभिषेकानंतर म्हणजे इ०स० १६७७मध्ये हे प्रमाण दर शंभर शब्दांमध्ये अडतीस फारसी शब्द आणि बासष्ट मराठी शब्द असे दिसते. इ०स० १७२८मध्ये, म्हणजे बरोबर शंभर वर्षांनी, दर शंभर शब्दांत सात फारसी आणि त्र्याण्णव मराठी शब्द असे प्रमाण दिसते. यावरून शिवाजीराज्यांच्या प्रयत्नांना कसे व किती यश आले, हे स्पष्ट होते. भाषेविषयी खरी कळकळ असेल आणि राजकीय इच्छाशक्ती असेल तर काय करता येते याचा नमुना शिवछत्रपतींनी आपल्यासमोर उभा केला आहे.

संतांनी संस्कृतच्या श्रेष्ठत्वाचे दडपण झुगारले. मराठीविषयीचा न्यूनगंड झटकून टाकला. संस्कृतचे ज्ञानभांडार त्यांनी स्वयंप्रज्ञेने उजळले आणि मराठीत आणले. संस्कृतवर प्रभुत्व असूनही त्यांनी मराठीचाच जाणीवपूर्वक वापर केला.

लोकसंवादाला त्यांनी प्राधान्य दिले. अंत:स्फूर्तीची, अंत:प्रतीतीची त्यांनी कास धरली. मराठीत त्यांनी 'ब्रह्मविद्येचा सुकाळु' केला. 'साहित्यसोनियांच्या खाणी' उघडल्या. त्यामुळे मराठी धर्मभाषा बनली. ज्ञानभाषा बनली. मराठी ग्रंथांची संस्कृत भाषांतरे होऊ लागली; एवढी प्रतिष्ठा त्यांनी मराठीला प्राप्त करून दिली. राजपुरुषांनी भाषेची शुद्धता राखली आणि तिला व्यवहारसुलभ रूप दिले.

लोकजीवन उन्नत व्हावयाचे तर लोकभाषेला धर्मभाषेची प्रतिष्ठा मिळाली पाहिजे. तिच्यात ज्ञानभाषेचे सामर्थ्य आणि साहित्याचे सौंदर्य आले पाहिजे. राजभाषा होऊनही ती सामान्यांना कळणारी असली पाहिजे; असे मध्ययुगीन लोकनेत्यांना वाटत होते. त्यामुळे संस्कृत किंवा फारसी वापरणे शक्य असताना त्यांनी सर्व क्षेत्रांत मराठीचा वापर केला. त्यामागे जनसामान्यांविषयी जिव्हाळा होता; लोकांशी संवाद साधण्याची ओढ होती आणि नव्या ज्ञानाच्या निर्मितीची जिद्द होती. भाषिक स्वातंत्र्य, भाषिक समता आणि भाषिक बंधुता यांचा असा आदर्श मध्ययुगीन मराठी संतांनी आणि राज्यकर्त्यांनी आपल्यापुढे ठेवला आहे. आपल्यालाही या वाटेने जाणे आवश्यक आहे.

**३) अर्वाचीन युगाच्या उष:काली**

एकोणिसाव्या शतकात मराठीसमोर इंग्रजीचे आव्हान उभे राहिले. शिक्षणाचे लोकशाहीकरण झाले. पाश्चात्त्य पद्धतीच्या शिक्षणसंस्था आल्या आणि शिक्षणाच्या माध्यमाचा प्रश्न ऐरणीवर आला. देशी भाषा, संस्कृतसारख्या अभिजात भाषा आणि इंग्रजीसारख्या पाश्चात्त्य भाषा यांच्या ताणात निर्णयाला हेलकावे मिळू लागले. राज्यकर्त्यांना अपेक्षित शिक्षण आणि लोकमानसाच्या गरजा यांनी या प्रश्नाला आणखी पीळ भरले.

एक विषय म्हणून आणि अध्यापनाचे माध्यम म्हणून महाविद्यालयीन पातळीवर मराठीचे अध्यापन सुखासुखी सुरू झालेले नाही. त्यामागील संघर्षाची कहाणी प्राचार्य ना०वि० पाटणकर ('मुंबई विद्यापीठात मराठीची प्रस्थापना १८५८ ते १९४७', १९८४) यांनी या पुस्तिकेत परिश्रमपूर्वक शोध घेऊन आधारासह सांगितली आहे. पाटणकरांचे बोट धरून आपण ती थोडक्यात समजावून घेऊ.

इ०स० १८४०मध्ये 'बोर्ड ऑफ एज्युकेशन'ने देशी भाषांना केंद्रीय महत्त्व देण्याची भूमिका घेतली. त्याने भाषांतरांवर भर दिला. निरनिराळ्या विषयांसाठी मराठीत क्रमिक पुस्तके तयार केली, करवून घेतली. निबंधलेखनासाठी पारितोषिके ठेवली. मराठीच्या अध्यापनासाठी प्राध्यापकांच्या जागा निर्माण केल्या. मराठीच्या अभिवृद्धीसाठी असे चौफेर प्रयत्न केले.

वैद्यकीय आणि अभियांत्रिकी शिक्षण मराठी माध्यमातून देण्याचे उद्दिष्ट समोर ठेवले. इ०स० १८६२-६३मध्ये पुणे येथे प्राचार्य कँडी यांच्या मार्गदर्शनाने 'व्हर्नाक्युलर कॉलेज' हे मराठी माध्यमातून सर्व विषय पदवीपर्यंत शिकविणारे महाविद्यालयही सुरू झाले. पण दुर्दैवाने ते १८६४-६५मध्ये कायमचे बंद झाले! कर्नल जर्व्हिस, जगन्नाथ शंकरशेट. क्रॉमजी, मकबा यांचा विरोध दुर्लक्षून 'बोर्ड ऑफ एज्युकेशन'च्या अध्यक्षीय अधिकारात सर अर्स्किन पेरी यांनी एक ठराव संमत करून घेतला. त्यामुळे माध्यमिक शिक्षणाचे माध्यम मातृभाषा न राहता इंग्रजी भाषा ठरली. ती दीर्घकाल राहिली. त्याचे दूरगामी परिणाम झाले.

भारतातील विद्यापीठाच्या स्थापनेपूर्वी प्रसिद्ध झालेला वूडचा शिक्षणखलिता (एज्युकेशन डिस्पॅच, १८५४) विद्यापीठीय शिक्षणाचा ध्रुवतारा समजला जातो. त्यात देशी भाषांना अग्रक्रम दिला असून संस्कृतसारख्या अभिजात भाषांना दुय्यम क्रम दिला आहे. इ०स० १८५७मध्ये मुंबई विद्यापीठाची स्थापना झाली. त्या वेळी मॅट्रिकपासून एम०ए०पर्यंतच्या सर्व वर्गांना मराठी हा विषय वैकल्पिक म्हणून होता. पहिल्या मॅट्रिकच्या परीक्षेला (इ०स० १८५९) महाराष्ट्र, कर्नाटक, सिंध व गुजरात एवढ्या प्रदेशांतून १३२ विद्यार्थी बसले. त्यांपैकी फक्त २२ विद्यार्थी पास होऊन (न्या०) म०गो० रानडे पहिले आले. पहिल्या बी०ए०ला (१८६२) बसलेल्या सात विद्यार्थ्यांपैकी चार विद्यार्थी उत्तीर्ण झाले. याही परीक्षेत (न्या०) म०गो० रानडे पहिले आले.

असेच चालू राहिले असते तर मराठीला महाविद्यालयीन पातळीवर उचित स्थान लवकरच मिळू शकले असते. तथापि मुंबई विद्यापीठाचे कुलगुरू ग्रँट यांनी डॉ० विल्सन यांचा विरोध झुगारून एक ठराव मंजूर करून घेतला. त्यामुळे मॅट्रिकपासून एम०ए०पर्यंतच्या अभ्यासक्रमातून मराठीचे उच्चाटन झाले. मॅट्रिकपर्यंत जरी मराठीचा विकल्प असला तरी प्रत्यक्षात माध्यमिक शाळेच्या तिसऱ्या इयत्तेपर्यंतच मराठीचा अभ्यास होत असे.

विद्यार्थ्यांना शिक्षण द्यावयाचे तर पाश्चात्त्य की पौर्वात्य असा एक वाद रंगलेला होता. यानंतर अभिजात भाषांवर भर द्यावयाचा की प्रचलित देशी भाषांवर असा वाद सुरू झाला. अभिजात भाषा विरुद्ध देशी भाषा यांच्या वादविवादाला 'द बॅटल ऑफ व्हर्नाक्युलर्स' म्हणजे देशी भाषांची रणधुमाळी असे म्हणतात. या वादात देशी भाषांची बाजू डॉ० विल्सन यांनी लढविली तर विरोधी बाजू कुलगुरू ग्रँट यांनी सांभाळली. या दोघांनी जे मुद्दे मांडले तेच अखेरपर्यंत कमी-अधिक भर घालून कायम राहिले.

देशी-भाषावाद्यांच्या मते देशी भाषा अभ्यासक्रमातून काढून टाकल्या तर दोन

अभिजात भाषांच्या अभ्यासाचा भार विद्यार्थ्यांवर पडेल. मातृभाषेचा पाया पक्का नसेल तर पुढे या विद्यार्थ्यांना संस्कृतचा अभ्यास झेपणार नाही. संस्कृत भाषेला वर्तमान व्यवहाराचा संदर्भ राहिलेला नाही. संस्कृत भाषेत बोलण्याची, लिहिण्याची, ग्रंथ वाचण्याची बहुसंख्य लोकांना कधीच गरज लागत नाही. स्वभाषा शिकू नका असे म्हणणे म्हणजे स्वत:ची संस्कृती विसरा, टाकून द्या; असे म्हणण्यासारखेच आहे. भारतातील सर्व देशी भाषांत विद्यापीठीय स्तराला अनुरूप अशा दर्जाचे भरपूर वाङ्मय उपलब्ध आहे. अशी देशी-भाषावाद्यांची भूमिका होती.

या भूमिकेवर आक्षेप घेऊन विरोधकांनी आपली भूमिका मांडली ती अशी - मराठीत उपलब्ध असलेली पुस्तके विद्यापीठीय पदवीपरीक्षेच्या दर्जाची नाहीत. मातृभाषेत लिहावयास शिकविणे हे विद्यापीठांचे काम नाही. उदारमतवादी माणूस घडविणे हे विद्यापीठांचे कर्तव्य आहे. देशी भाषांचे ओझे कमी केले तर अभिजात भाषांच्या अध्ययनाला अधिक चालना मिळेल. विद्यार्थ्यांची बौद्धिक पातळी वाढेल. ही सूचना अधिक उपयुक्त आणि व्यवहार्य आहे; अशी देशी-भाषाविरोधकांची भूमिका होती.

या वादात विरोधकांची सरशी झाली. त्यामुळे इ०स० १८६४ ते १९०० या काळात विद्यापीठीय अभ्यासक्रमातून मराठीचे उच्चाटन झाले.

या मधल्या काळात शिक्षणसंचालक पील यांनी मॅट्रिकपर्यंत मातृभाषा सक्तीची करावी, असा ठराव विद्यापीठाकडे पाठविला. एल्फिन्स्टन कॉलेजचे प्राचार्य आग्झनहॅम यांनी त्याचा पुरस्कार करताना लिहिले होते - ''जे विद्यापीठ आपल्या क्षेत्रातील लोकांच्या वाङ्मयाच्या जोपासनेची आणि विकासाची काळजी घेण्याचे टाळते ते नामशेष होणे हेच योग्य आणि काळाने ते नामशेष होणारच.'' बाळ वागळे आणि रेव्हरंड रॉबर्टसन यांनीही या सूचनेचा पुरस्कार केला. तथापि रा०गो० भांडारकर आणि इतर यांनी केलेल्या विरोधामुळे तो बारगळला.

विद्यापीठीय अभ्यासक्रमात मराठीची पुन:स्थापना व्हावी म्हणून सातत्याने आणि पद्धतशीर प्रयत्न केले ते न्यायमूर्ती महादेव गोविंद रानडे (इ०स० १८४२ ते १९०१) यांनी १८७०पासूनच त्यांनी विद्यापीठावर लोकमताचे दडपण आणण्यासाठी प्रयत्न केले. 'विद्यापीठ आणि देशी भाषा' या विषयावर ग०त्र्यं० जोशी यांच्याकडून त्यांनी अभ्यासपूर्ण निबंध लिहवून घेतला आणि पुण्याच्या सार्वजनिक सभेत त्यावर चर्चा घडवून आणली. पुढे त्यांनी साहित्यसंमेलनाची गंगोत्री ठरलेले 'पहिले ग्रंथकारसंमेलन' (पुणे. मे, १८७७) भरविले. मराठी पुस्तकांना पारितोषिके देणाऱ्या 'मराठी ग्रंथोत्तेजक मंडळी'ची स्थापना केली.

'मराठी ग्रंथसंपत्ती' या विषयावर व्याख्याने दिली. इतरांची व्याख्याने घडवून आणली. नियतकालिकातून या विषयावर लेखन केले. मराठीत निर्माण झालेल्या एकूण वाङ्मयाचे अवलोकन करणे, त्यातील प्रवृत्तींचे दिग्दर्शन करणे आणि त्यातील चांगल्या-वाइटाची चर्चा करून नि:पक्षपाती मूल्यमापन करणे हे किचकट काम त्यांनी दोन वेळा केले. आरंभापासून इ०स० १८६४पर्यंतच्या मराठी पुस्तकांच्या तालिकीकरणाचे हे काम त्यांच्याकडे आले होते. इ०स० १८६७पासून 'रजिस्ट्रार ऑफ नेटिव्ह पब्लिकेशन्स'च्या वतीने वार्षिक प्रतिवृत्ते प्रसिद्ध होऊ लागली. इ०स० १८६५ ते १८९७पर्यंतच्या ग्रंथसंपत्तीचा आढावा न्या० म०गो० रानडे यांनी घेतला. ''ए नोट ऑन द ग्रोथ ऑफ मराठी लिटरेचर''(१८९८) हा त्यांचा अहवाल ''मराठी वाङ्मयाची अभिवृद्धी : एक टिपण'' या नावाने भाषांतर करून डॉ० स०गं० मालशे यांनी मराठी संशोधन मंडळाच्या वतीने प्रसिद्ध केला. (१९८२) त्यात न्या० रानडे यांनी ग्रंथांची मोजदाद केली. त्यांचे वर्गीकरण केले. नामांकित चाळीस कवींची नोंद केली. नऊ विद्वानांकडून शंभर पुस्तकांच्या याद्या मागवून घेतल्या. त्यात समान असणाऱ्या साठ पुस्तकांची त्यांनी नोंद केली. त्यावर 'शालापत्रक' या मासिकाने चर्चा केली आणि त्या यादीत ऐंशी पुस्तकांची भर घातली. मध्ययुगापासून अर्वाचीन भारताच्या उष:कालापर्यंतचे हे लेखक-कवी म्हणजे सुधारणांचे प्रतिनिधी होत; असा त्यांचा गौरव रानड्यांनी केला आहे. जुन्या मराठी वाङ्मयाचे गुणदोष त्यांनी विशद केले. आज ज्याला देशीवाद म्हणतात त्याची भूमिका बीजरूपाने रानड्यांनी मांडली. वाङ्मयाच्या इतिहासाला सामग्री पुरविणारे विपुल तपशील या अहवालात आहेत. त्याचप्रमाणे हा अहवाल स्वत:च तथ्यलक्ष्यी वाङ्मयेतिहासाचे रूप घेताना दिसतो. त्याद्वारे मराठी भाषा व वाङ्मय विद्यापीठीय पातळीवर अभ्यासले जाण्याइतके समर्थ व सक्षम आहे, असे न्या० रानडे यांनी दाखवून दिले.

समकालीन काव्याच्या ऱ्हासाचे एक कारण न्या० रानडे यांनी अभिजात भाषांच्या अभ्यासाचा भार आणि राष्ट्रीय ज्ञानभांडाराविषयी अनभिज्ञता या दोन गोष्टींत शोधले आहे. अभिजात भाषांतील व इंग्रजीतील आदर्शांच्या अध्ययनाबरोबरच स्वकीय प्राचीन कवींच्या अध्ययनाची आवश्यकता सांगताना रानडे म्हणतात, ''एखाद्या कोवळ्या रोपट्यावर विदेशी कलम करावयाचे असल्यास व जर का ते मायदेशच्या मातीत उगवून त्याची पाळेमुळे खोलवर गेलेली नसल्यास ते कलम कधीच वाढणार व बहरणार नाही. मूळच्या जिवंत वृक्षाला पाणी घालून त्याची नीट जोपासना केलेली असेल, तरच परदेशी खतामुळे त्याच्या स्वादात व सौंदर्यात भर पडेल.'' (उपरोक्त पृ०१२) अशा आलंकारिक शैलीत त्यांनी




अनुक्रमणिका

मातृभाषा व परभाषा यांच्या अध्ययनातील तारतम्य स्पष्ट केले आहे.

याच अहवालाच्या शेवटी आपले निष्कर्ष रानडे यांनी नमूद केले असून त्यात व मुंबई विद्यापीठाकडे केलेल्या अर्जाच्या प्रतीतही मराठीच्या अभ्यासाची निकड व आवश्यकता प्रतिपादन करून याविषयीच्या आक्षेपांचे निरसन केले आहे. मुंबई विद्यापीठात मराठीची पुन:स्थापना व्हावी, यासाठी न्या० रानडे यांनी अभिनव उपक्रम केले, परिश्रम घेतले आणि पुढाकारही घेतला. अखेरीस चिमणलाल सेटलवाड यांनी एम०ए० परीक्षेसाठी मराठीच्या तीन प्रश्नपत्रिका असाव्यात; असा ऐतिहासिक ठराव मांडला. २९ जानेवारी १९०१ रोजी विद्यापीठाने त्यास मान्यता दिली. तथापि हे यश पाहण्यास न्या० रानडे राहिले नव्हते. त्याआधीच १६ जानेवारी १९०१ रोजी त्यांचे देहावसान झाले होते.

इ०स० १९०१पासून पुन्हा मॅट्रिकप्रमाणे एम०ए०लाही मराठी विषय विकल्पाने ठेवला गेला पण मधल्या चार वर्षांसाठी तो नसल्याने फार कमी विद्यार्थी तो घेत. १९२९मध्ये प०म० लिमये यांच्या प्रयत्नामुळे दोन प्रश्नपत्रिकांपुरता बी०ए० परीक्षेसाठी मराठीचा स्वीकार केला गेला. इ०स० १९२९मध्ये एम०ए०साठी मराठीच्या सहा प्रश्नपत्रिका मान्य झाल्या. इ०स० १९३२मध्ये डी०लिट० ही आर्ट्स विभागातील सर्वोच्च पदवी व इ०स० १९३४मध्ये पीएच०डी० ही उच्चतर पदवी देण्याचे मान्य झाले. मा०त्र्यं० पटवर्धन (माधव ज्यूलियन) यांनी 'छंदोरचना' लिहून इ०स० १९३८मध्ये डी०लिट० मिळविली. साहित्यसम्राट न०चिं० केळकर हे पीएच०डी०चे मार्गदर्शक. त्यांचे विद्यार्थी पु०ग० सहस्रबुद्धे यांनी 'स्वभावलेखन' लिहून १९३९मध्ये पहिली पीएच०डी० मिळविली. इ०स० १९३५मध्ये प्रा० म०रा० परांजपे यांनी एकत्रित भाषामंडळापासून स्वतंत्र मराठी भाषामंडळाची स्थापना करवून घेतली. त्यामुळे मराठी बी०ए० ऑनर्सची सोय करता आली. इ०स० १९३८मध्ये मॅट्रिकनंतर प्रिव्हियस व इंटरमीजिएट या परीक्षांना मराठी घेण्याची परवानगी मिळाली तरीही मुंबई राज्यात मराठीतून अध्यापन सुरू होण्यास दीर्घ काल लागला.

१९४९च्या सुमारास त्या वेळच्या मुंबई राज्यात केवळ परीक्षा घेण्यापेक्षा पदव्युत्तर पातळीवर अध्यापन, संशोधन करणारी विद्यापीठे स्थापन होऊ लागली. विद्यापीठांत विविध विषयांची अध्यासने निर्माण होऊ लागली. पुणे विद्यापीठात मराठीचे अध्यासन निर्माण झाले. पुढे राष्ट्रीय पातळीवर विद्यापीठ अनुदान मंडळ स्थापन झाले. त्याने सर्वच नवी व जुनी विद्यापीठे पदव्युत्तर पातळीवर विभाग स्थापून अध्यापन, संशोधन करणारी केंद्रे केली. त्या प्रक्रियेत मुंबई विद्यापीठात मराठीचे अध्यासन निर्माण होण्यास १९६९ हे वर्ष उजाडावे लागले! तत्पूर्वी इतर

अनेक विद्यापीठांत ती निर्माण झाली होती.

मराठीच्या अध्यापनशास्त्राचीही अशीच गळचेपी झाली. इ०स० १९२४-२५मध्ये बी०टी० (आता बी०एड०) अभ्यासक्रम सुरू झाला. विद्यापीठाची मान्यता असूनही मुंबईच्या एकुलत्या एक सरकारी प्रशिक्षण महाविद्यालयात मराठीची अध्यापनपद्धती शिकविली जात नसे. इ०स० १९३४मध्ये कोल्हापूरच्या एस०एम०टी०टी० महाविद्यालयात मराठीची अध्यापनपद्धती शिकवीत ती इंग्रजीतून, इंग्रजी पुस्तकांच्या साहाय्याने! इ०स० १९४१-४२पासून प्रशिक्षण महाविद्यालयात मराठीला तिचे असे योग्य स्थान मिळू लागले.

आज महाराष्ट्राच्या सर्व विद्यापीठांतून मराठीची अध्यासने आहेत, विभाग आहेत. प्राथमिक शाळेपासून सर्वोच्च पदवीपर्यंत मराठी विषय घेण्याची सोय आहे.

इतके झाले तरी मराठीचे दुर्दैव मिटले आणि संघर्ष संपला असे दिसत नाही. संस्कृत ही ज्ञानभाषा आणि फारसी ही राजभाषा यांचे वर्चस्व सहन करीत मराठी मध्ययुगापासून वाढत आली आहे. आज ती तत्त्वतः राजभाषा आहे. तथापि व्यवहारतः ज्ञानभाषा इंग्रजी आणि राजभाषा हिंदी यांच्या तुलनेने ती व्यवहारभाषेच्या पातळीवरच राहिली आहे. आज पुन्हा इंग्रजी माध्यमांच्या शाळांना वाढती प्रतिष्ठा मिळत आहे! विद्यापीठांच्या कलाशाखेशिवाय इतर अनेक शाखांतून मराठीचे उच्चाटन झाले आहे! अनेक विषय मराठी माध्यमातून शिकण्याची सोय उपलब्ध नाही. आज आमच्या विद्यापीठातील इंग्रजी माध्यमातून शिकणारा विद्यार्थी एकही भारतीय भाषा न शिकता पदवीधर होऊ शकतो. एका बाजूला, सुशिक्षितांनी समाजाच्या सुखदु:खाशी एकरूप व्हावं असे आपण सांगतो. दुसऱ्या बाजूला, त्यांनी भारतीय भाषांशी संपर्क ठेवावा असा कुठंच आग्रह नाही.

निरनिराळ्या विद्याशाखांमध्ये, निरनिराळ्या स्तरांवर आणि विविध रूपांत मराठी विषयाचा अंतर्भाव व्हावा आणि अध्यापनाचे माध्यम म्हणून मराठी भाषेचा स्वीकार व्हावा यासाठी अजूनही खूप झगडावे लागणार आहे. त्यासाठी विद्यापीठीय पातळीवरील मराठीच्या प्रस्थापनेचा हा संघर्षमय इतिहास आपण जागता ठेवला पाहिजे.

अध्ययनाचा विषय आणि अध्यापनाचे माध्यम म्हणून आज मराठीला जो वाव मिळाला आहे त्याचा आपण कितपत उपयोग करीत आहोत, हाही एक प्रश्नच आहे. आपल्या विद्यापीठांच्या मराठीच्या अभ्यासक्रमांची आखणी अत्यंत सदोष आहे. त्यात विद्यार्थी मिळविण्याच्या स्पर्धेपायी अभ्यासक्रम अधिक पातळ करण्याची चढाओढ आहे. वाईट अभ्यासक्रम चांगल्या प्राध्यापकांनी शिकवूनही त्याचा उपयोग

नसतो. याउलट चांगला अभ्यासक्रम वाईट प्राध्यापकांनी शिकविला तरी तो लाभप्रदच असतो. त्यात विद्यार्थ्याला स्वतःच्या प्रयत्नांच्या बळावर नेमक्या मर्मग्रहणाकडे जाणे शक्य असते. अभ्यासक्रमासाठी नियुक्त केलेल्या पुस्तकांचा दर्जा व निवडीचे निकष वादग्रस्त आहेत. अनेक प्रकारच्या चुका अभ्यासक्रमात, पुस्तकात, प्रश्नपत्रिकेत असतात. तरीही विद्यार्थ्यांना सत्तर टक्क्यांहून अधिक गुण सहज मिळतात. या आणि अशा कितीतरी बार्बीची लाज वाटायचेही आता बंद झाले आहे. मराठीच्या अशा निकृष्ट शिक्षणाचा उपयोग तरी काय? मराठीचे अध्ययन-अध्यापन सकस झाल्याशिवाय मराठीच्या नावाने गळा काढण्यात कोणता अर्थ आहे?

एकोणिसाव्या शतकात मराठीसमोर इंग्रजीचे आव्हान उभे राहिले तेव्हाही न्यायमूर्ती म०गो० रानडे यांच्यापासून महर्षी वि०रा० शिंदे यांच्यापर्यंतच्या प्रबोधकांनी मराठीच्या विकासाच्या नाना वाटा शोधल्या. त्यांना परंपरेचे स्वत्व टिकवायचे होते. आणि नव्या युगाच्या प्रश्नांची सोडवणूक करावयाची होती. विद्यापीठामध्ये मराठीचा समावेश व्हावा म्हणून त्यांनी चाळीस वर्षे चिकाटीने लढा दिला. अव्वल इंग्रजीतील समाजधुरीणांनी अमूर्त संकल्पनांपासून दैनंदिन घरगुती विषयांवर मराठीतून लेखन केले. नव्या पारिभाषिक संज्ञा घडविल्या. संस्कृत व इंग्रजी ग्रंथांची भाषांतरे केली. विद्यार्थ्यांसाठी पाठ्यपुस्तके सिद्ध केली. वैचारिक मराठी गद्याची एक समर्थ परंपरा निर्माण केली. नव्या वळणाची साहित्यनिर्मिती केली. 'वाघिणीचे दूध' पचवून त्यांनी मराठीचे सत्त्व वाढविण्याची धडपड केली.

मराठीच्या आजच्या प्रश्नांना सामोरे जायचे असेल तर मध्ययुगीन संतांनी, राजपुरुषांनी आणि एकोणिसाव्या शतकातील प्रबोधकांनी अवरुद्ध झालेल्या मराठीला कसे सक्षम बनविले, ते आपल्या डोळ्यासमोर हवे.

## संदर्भ आणि टिपा


१) एकनाथ, 'सार्थ व सटीप श्रीएकनाथी भागवत', गं०रा० सोमण, प्रकाशक व चिटणीस, श्रीएकनाथ मंडळ, सातारा, भाग १, पुणे-सातारा, १९७३, भाग २, मुंबई-सातारा, १९७३, भाग ३, पुणे-सातारा, १९७३.

२) पाटणकर ना०वि०, 'मुंबई विद्यापीठात मराठीची प्रस्थापना १८५८ ते १९४७' कृ०श्री० अर्जुनवाडकर, मराठी विभाग, मुंबई विद्यापीठ, मुंबई १९८४

(मराठीच्या महाविद्यालयीन प्रस्थापनेविषयीच्या तपशीलाचे मूळ आधार या पुस्तिकेत पाहावेत.)







अनुक्रमणिका

३) भावे वि०ल०, 'महाराष्ट्र-सारस्वत' शं०गो० तुळपुळे यांच्या पुरवणीसह, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, आवृत्ती पाचवी (इ०स० १९६३) (प०आ० १८९९)

४) राजवाडे वि०का०, ''इतिहासाचार्य वि०का० राजवाडे समग्र वाङ्मय'' खंड पहिला, 'मराठी भाषा व व्याकरण', मु०ब० शाह (संपा०) गिरीश मांडके (साहाय्यक), राजवाडे संशोधन मंडळ, धुळे-पुणे, १९९५. (याचे एकूण तेरा खंड असून तेरावा खंड १९९८मध्ये प्रकाशित झाला).

५) ........., 'स्मृतिस्थळ', शं०गो० तुळपुळे (संपा०), अनमोल प्रकाशन, पुणे दु०आ० १९९० (प०आ० १९६९)

६) ज्ञानेश्वर, 'ज्ञानेश्वरी' सोनोपंत दांडेकर - अ०का० प्रियोळकर इत्यादी (संपा०) महाराष्ट्र राज्य शिक्षण खाते, मुंबई, आवृत्ती तिसरी १९६३

७) टीप : माझे पूर्वीचे काही लेख वाचीत असताना त्यांत एक सूत्र मला अंधुकपणे जाणवले. मराठीचे आज जे प्रश्न आहेत तेच कालही होते. तेव्हा कालच्या समाजाने या प्रश्नांची कोणती उत्तरे दिली याचा शोध घेतला तर आजच्या प्रश्नांची सोडवणूक करण्यासाठी काही दिशा मिळू शकेल, हे ते सूत्र होय. माझ्या पुढील लेखातील काही माहिती, तपशील, तथ्ये व विचार यांची वेगळ्या संदर्भात पुनर्रचना करून प्रस्तुत लेख सिद्ध करण्यात आला आहे. त्यापैकी काही लेखांचा संदर्भ देत आहे.

१. 'समारोप', समाविष्ट 'वाङ्मयाचे महाविद्यालयीन अध्यापन : डॉ० दु०का० संत गौरवग्रंथ', मंचरकर र०बा० (संपा०), सौरभ प्रकाशन, कोल्हापूर १९८७, पृ०४७५-९७.

२. 'मराठी संतसाहित्याची प्रस्तुतता' समाविष्ट 'वारकरी संप्रदाय आणि संतसाहित्य' शिवाजीराव मोहिते (संपा०, प्रका०) कर्मवीर प्रकाशन, पुणे २००८, पृ० ९ ते ३२

३. 'वृथा ही बढाअी सुकार्याविणे', समाविष्ट 'हद्दपारीच्या वाटेवरील मराठी', प्रभाकर बागले (संपा.), अनुष्टुभ प्रतिष्ठान, मुंबई २००२, पृ० १७ ते ३१

८) टीप : या लेखावर संस्करण करण्यासाठी प्रा० प्र०ना० परांजपे, संपादक, 'भाषा आणि जीवन' यांनी काही उपयुक्त सूचना केल्या. त्याबद्दल मी त्यांचे येथेच आभार मानतो.

■

श्रीस्वामी समर्थ, 19, नंदनवन कॉलनी,
कोहिनूर मंगल कार्यालयासमोर, सावेडी, अहमदनगर, 414 003
स्थिरभाष (0241) (2423575)
चलभाष 094228 64078

# भाषा संचालनालय - काल आणि आज

**अनुराधा मोहनी**

भाषावार प्रांतरचनेच्या अंतर्गत एक मे एकोणीसशे साठ रोजी महाराष्ट्र राज्याची स्थापना झाली. साहजिकच या राज्याचे प्रशासन मराठीतून केले जाणे अपेक्षित होते. स्वातंत्र्यानंतर आपण अंगीकारलेले कल्याणकारी शासन हे जीवनाच्या अनेक अंगांना स्पर्श करीत असल्यामुळे त्याच्या कक्षा विस्तृत आहेत. जनजीवनाच्या सर्व अंगांना पुरी पडेल अशी मराठी भाषा नव्याने विकसित करण्यासाठी तत्कालीन मुख्यमंत्री यशवंतराव चव्हाण यांनी ६ जुलै १९६० रोजी भाषा संचालनालयाची स्थापना केली.

भाषा संचालनालय हे कार्य तीन प्रकारे करते :

१) उच्च शिक्षणाचे माध्यम म्हणून मराठी

२) शासन-व्यवहारात मराठी

३) विधि व न्यायव्यवहारात मराठी

उच्च शिक्षणाचे माध्यम म्हणून मराठीचा पुरस्कार करण्यात आला. शिक्षण व उच्च शिक्षण ज्या भाषेत होते, त्याच भाषेत विचार करण्याची सवय आपल्याला लागते. त्यासाठी विद्यापीठात शिकवल्या जाणाऱ्या विषयांच्या परिभाषा-निर्मितीचे काम, सर्व विद्यापीठांच्या सहकार्याने करण्यासाठी, भाषा संचालनालयाकडे सोपविण्यात आले. आजतागायत वैद्यकशास्त्र, अभियांत्रिकी, मानविकी, विज्ञान इत्यादी विद्याशाखांमधील विषयांचे ४३ कोश संचालनालयाने प्रकाशित केले आहेत.

कार्यालयीन कामकाजात प्रशासकीय मराठीचा वापर करण्यासाठी अधिकारी-कर्मचारी यांना मार्गदर्शक ठरतील अशी काही पुस्तके भाषा संचालनालयाने प्रकाशित केली. उदा० शासन व्यवहार कोश, प्रशासनिक लेखन, राजभाषा परिचय, इ०

प्रत्येक नागरिकाला त्याच्यासाठी असलेल्या कायद्यांचे पालन करावे लागते. तसेच आपल्यावर झालेल्या अन्यायाच्या परिमार्जनार्थ न्यायालयात जावे लागते आणि तिथे दिलेल्या निवाड्याचे पालनही करावे लागते. तेव्हा कायदे आणि निवाडे हे दोन्ही त्याला समजतील अशा भाषेत असणे आवश्यक आहे. त्यानुसार आता विधेयके मांडतानाच ती मराठीतून मांडली जातात. मराठीमधील राज्य-अधिनियम हे मूळ अधिनियम (ॲक्ट) असून इंग्रजी अधिनियम हे अनुवादित असल्याचे मानले

जाते. संचालनालयाचे सर्व राज्य-अधिनियम, निवडक केंद्रीय अधिनियम (एकूण १२७) 'न्यायव्यवहार कोश' नामक न्यायविषयक परिभाषेचा कोश, निवडक न्यायनिर्णय इतकी या विषयावरील सामुग्री प्रकाशित केली आहे. एवढ्या सामुग्रीच्या साहाय्याने कायद्याचे मराठीतून शिक्षण आणि कनिष्ठ न्यायालयांमध्ये मराठीतून काम करणे हे दोन्ही साध्य करता येईल.

उपरोक्त तिन्ही क्षेत्रांमध्ये संचालनालयाने किती महत्त्वाची कामगिरी बजावली आहे याची आता कल्पना यावी. कायदे, अहवाल इत्यादींचा मराठी अनुवाद, परिभाषा कोश निर्मिती, राज्य शासनाच्या राजपत्रित व अराजपत्रित कर्मचाऱ्यांसाठी मराठी भाषा परीक्षांचे आयोजन, मराठी टंकलेखन/लघुलेखन परीक्षांचे आयोजन अशी अनेकविध कामे संचालनालयाने केली आहेत.

पण एवढे सगळे असूनही, आज राजभाषेची परिस्थिती काय आहे? साठ साली तिला जे स्थान होते ते आज बरेच खाली गेले आहे. ती राजभाषा असल्याची जाणीवच नागरिकांना राहिलेली नाही. मराठीत बोलणे, लिहिणे, वाचणे कमीपणाचे मानले जाऊ लागले आहे. भाषा संचालनालयाने केलेले परिश्रम वाया गेले आहेत. मराठीतील परिभाषेची कुणाला माहिती नाही. मराठी तरुणवर्ग भाषेच्या बाबतीत स्वाभिमान व आत्मविश्वास पूर्णपणे हरवून हिंदी, इंग्रजी वा अन्य भाषांच्या आश्रयाला जात आहे.

भाषा संचालनालय हे विद्याविषयक (अकॅडेमिक) कार्यालय आहे. माधव गोपाळ मोहनी हे संचालनालयाचे पहिले संचालक होते. त्यानंतरचे भाषासंचालक डॉ० वा०ना० पंडित, डॉ० वा०म० कुलकर्णी, के०मा० आराध्ये, य०शं० कानिटकर, डॉ० न०ब० पाटील हे सर्वच भाषा क्षेत्रांतील थोर मान्यवर होते. 'शब्दानंद' ह्या त्रैभाषिक कोशाच्या कर्त्या सत्त्वशीला सामंत, 'प्रशासनिक मराठी' या विषयावर पहिली पीएच०डी० मिळवणाऱ्या गीता भागवत ह्याही भाषा संचालनालयामध्ये अधिकारी होत्या. संचालनालयाचे एक निवृत्त अधिकारी अ०स० कदम असे म्हणत, की एखाद्या क्लिष्ट वाक्याचा अनुवाद जमला, की मला एखादे गणित किंवा शब्दकोडे सोडवल्याचा आनंद होतो. त्या लोकांच्या आपसांत चर्चा होत आणि त्यांमधून अनेक नवीन मराठी शब्द जन्मास येत. कायद्याची (अधिनियमांची) भाषाशैली विकसित केली ती भाषा संचालनालयानेच. परिभाषा कोशनिर्मिती हे जरी विद्यापीठांमधील तज्ज्ञांच्या उपसमितीचे काम असले, तरी निरनिराळ्या शब्दांचे पर्यायी मराठी शब्द घडवताना करावयाची शब्दसिद्धी एकाच प्रकारे करणे, एखाद्या क्रियेचा वाचक म्हणून घेतलेला धातू सगळीकडे तोच ठेवणे,

परिभाषेमध्ये एक समान दर्जा टिकविणे या सर्व बाबी सदस्य-सचिव या नात्याने त्या त्या वेळच्या भाषा संचालकांना सांभाळाव्या लागत, संचालनालयाचे कोश उघडून पाहिले तर त्यांमधील शब्दसंपदा पाहून कोणत्याही भाषाप्रेमीचे मन उचंबळून आल्याशिवाय राहणार नाही आणि त्यांमधील शब्द वेगवेगळ्या अर्थाचे दर्शक असूनही, एकाच मुशीतून काढल्यासारखे दिसतील. लक्षात घ्या - एका शासकीय संस्थेचे हे कार्य आहे, आणि मराठी समाजाला आपल्या भाषेतून 'जगता' यावे या हेतूने ते केलेले आहे.

वर्ष २००२-०३पर्यंत संचालनालयाची परिस्थिती साधारण बरी होती. ती पूर्वसूरींच्या पुण्याईमुळेच. वस्तुतः त्याच्या आधीच त्याच्या घसरणीला प्रारंभ झाला होता. त्यासाठी जे घटक कारणीभूत झाले, त्यांचा क्रमशः विचार करू.

संचालनालयाची रचना आणि कार्यपद्धती ज्यांनी कुणी केली असेल त्यांनी फारच उत्तम रीतीने केली आहे. प्रत्येक कार्याची अंतिम जबाबदारी नेमून दिलेली आहे आणि संचालनालयाने निर्माण केलेल्या परिभाषेला अधिकृततेचा दर्जाही निश्चितपणे दिलेला आहे. परंतु असे असूनही एकूण यंत्रणेत काही संरचनात्मक त्रुटी राहिल्या आहेत. पहिली गोष्ट अशी, की भाषा संचालनालय ह्या विद्याविषयक कार्यालयाची स्थापना भाषेशी सुतराम संबंध नसलेल्या 'सामान्य प्रशासन विभागाच्या' (सा०प्र०वि०) अंतर्गत करण्यात आली. त्या विभागाच्या वरिष्ठ अधिकाऱ्यांना त्या विषयात रस नाही, आणि त्याबद्दल गम्य नाही, आस्थाही नाही. भाषा-संचालक हे 'उपसचिव' ह्या दर्जाचे पद आहे. भाषेच्या संबंधातले काही अत्यंत महत्त्वाचे धोरणात्मक निर्णय घ्यायचे असल्यास ते अधिक वरिष्ठ अशा सहसचिव, सचिव यांसारख्या अधिकाऱ्यांना घ्यावे लागतात, परंतु सा०प्र०वि०मधील असे अधिकारी भाषातज्ज्ञ नसतात. ते बहुशः अमराठी असतात; अनेकदा मराठीद्वेष्टेही असतात. भाषा संचालकांना अधिकार नाहीत आणि ज्यांना अधिकार आहेत, त्यांना विषयाची जाण वा आस्था नाही, यामुळे मराठीची विलक्षण गोची होत आली आहे.

महाराष्ट्र शासनाने मराठी परिभाषा निर्माण करण्याची सोय केली. परंतु ती वापरात कशी येईल आणि प्रमाण-भाषेचे स्थान तिला कसे मिळेल याचा काहीच विचार केला नाही. भौतिकशास्त्र, रसायनशास्त्र, शिक्षणशास्त्र, मानसशास्त्र, व्यवसाय व्यवस्थापनशास्त्र अशा अनेक विषयांवरचे परिभाषा कोश भाषा संचालनालयाने प्रकाशित केले; परंतु ती परिभाषा लोकांपर्यंत पोहोचलीच नाही. महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती मंडळ, विद्यापीठ ग्रंथनिर्मिती मंडळ यांवर ही परिभाषा वापरणे

बंधनकारक असल्याचे धूसरपणे ऐकिवात आहे. परंतु प्रत्यक्षात तसा आदेश वा शासन-निर्णय आढळून आलेला नाही. म०रा० साहित्य संस्कृती मंडळ, विश्वकोश निर्मिती मंडळ, राज्य मराठी विकास संस्था यांच्यावर असे काही बंधन असल्याचे ऐकिवात नाही. भाषा संचालनालयाची शब्दसंपदा वापरणे किंवा आपल्याला हवी ती शब्दसंपदा संचालनालयाच्या साहाय्याने तयार करून घेणे यासाठी त्यांच्याकडून काहीही होताना दिसत नाही. संचालनालयाचे परिभाषा-कोश हे फक्त शासकीय ग्रंथागारांमध्येच विकत मिळतात. ही ग्रंथागारे मुंबई, पुणे, औरंगाबाद इत्यादी ७-८ मोठ्या शहरांमध्येच आहेत. महाराष्ट्राच्या सर्व जिल्ह्यांमध्ये ती नाहीत आणि लहान गावांमध्ये तर नाहीतच नाहीत. लहान गावांमधील लोकांना अशी काही मराठी परिभाषा आहे, मराठीतून कायदे वाचता येतात याचा पत्ताही नाही आणि असला तरी त्यांना ते उपलब्ध नाहीत. मोठ्या शहरांमधील ग्रंथागारेही फक्त कार्यालयीन वेळातच काम करतात. तेथे संध्याकाळी वा दुपारच्या जेवणाच्या वेळी जाऊन पुस्तक-खरेदी करता येत नाहीत. वेळेत जाऊनही पुस्तक मिळण्याची शाश्वती नाही. कारण तेथील कर्मचारी पुस्तके शोधून आणून देण्याचा अतिशय कंटाळा करतात. शासनाची पुस्तकविक्रीची अनास्थाही, बऱ्याच अंशी भाषा संचालनालयास मारक ठरली आहे.

भाषा संचालनालयामध्ये शासकीय कागदपत्रांचा मराठी अनुवाद करण्यात येतो. त्या अनुषंगाने मंत्रालयातील अनेक विभागांशी उदा० वित्त विभाग, विधी व न्याय विभाग इत्यादींशी त्यांचा संबंध येतो. परंतु निवडक विभागांमधील मोजकी कार्यासने (डेस्क) सोडली, तर इतर अनेकांना भाषा संचालनालयाच्या अस्तित्वाची, कार्याची व कार्यपद्धतीची कल्पना नाही. खुद्द मंत्रालयातच ही परिस्थिती आहे. सप्टेंबर २००२पासून ऑगस्ट २०१०पर्यंत भाषा-संचालक हे पद भरले गेलेले नव्हते. सा०प्र०वि०मधील कार्यासन २० ब कडे भाषा संचालनालयाचा विषय आहे. पदासाठी पात्र उमेदवार न मिळाल्यामुळे संचालकाचा प्रभार कार्यासन २० ब च्या उपसचिवांकडेच दिला जात आहे. ह्या उपसचिवांच्या बदल्या होत राहतात. अशा रीतीने गेल्या आठ वर्षांत सुमारे बारा वेळा भाषा संचालनालयाचे संचालक बदलले. त्यांपैकी बहुतेक लोक चांगले प्रशासक होते. परंतु भाषा हा त्यांचा विषय नव्हता आणि मंत्रालयातील त्यांच्या कामाच्या अतिरिक्त, त्यांना हा जादा प्रभार देण्यात आला होता. संचालनालयाचे कार्यालय वांद्रे (पू०) येथे आहे. म्हणजे चर्चगेट-वांद्रे हा प्रवास आला. पुन्हा ह्या सर्व कटकटी अल्प मोबदल्यात! त्यामुळे हे कुणीच 'स्थिर शासन' देऊ शकले नाहीत. प्रभारी संचालकांचा 'जमाना' आल्यापासून सा०प्र०वि०मध्ये भाषा संचालनालयाचा बराच बोलबाला झाला आहे. नाहीतर

आधी हे नावही फारसे कुणाला माहीत नव्हते. मंत्रालयाचा भाग न मानता हे संलग्न कार्यालय मानले जाते. मंत्रालयीन विभाग व संचालनालय यांच्यामध्ये कुठलीही संपर्क-यंत्रणा नाही.

**न्याययंत्रणा**

न्याय व्यवहाराला लागणारी मराठी परिभाषा हेदेखील भाषा संचालनालयाची एक महत्त्वपूर्ण कामगिरी आहे. सर्व राज्य अधिनियम, निवडक व महत्त्वाचे केंद्रीय अधिनियम, न्यायनिर्णय व न्यायव्यवहार कोश नामक शब्दकोश एवढ्या सामुग्रीचा मी वर उल्लेख केलेलाच आहे. त्याशिवाय 'न्यायालयीन व्यवहारात मराठी भाषेचा वापर' नामक एक मोहीम आहे. ती अधूनमधून डोके वर काढतच असते. तिला अनुसरून काही जनहित याचिका दाखल केल्या जातात. आतापर्यंत एम०पी० वशी विरुद्ध महाराष्ट्र शासन ही २००४ साली तर वसंत मिस्त्री विरुद्ध महाराष्ट्र शासन ही याचिका २००५ साली (वा त्याच्या आसपास) दाखल करण्यात आली होती. या दुसऱ्या याचिकेच्या संदर्भात मुंबई उच्च न्यायालयाने भाषा संचालनालयाला आदेश दिला होता. त्यानुसार संचालनालयाने १५० राज्य-अधिनियम पुस्तकरूपाने प्रकाशित करून आणि चाळीस केंद्रीय अधिनियम नव्याने अनुवादित करून अल्पावधीत उच्च न्यायालयास उपलब्ध करून दिले. परंतु दुर्दैवाची गोष्ट अशी की न्यायव्यवहारात मराठीच्या संदर्भात एवढे मोठे व पायाभूत कार्य करूनही महाराष्ट्र राज्यातील न्याययंत्रणेने म्हणा वा मुंबई उच्च न्यायालयाने म्हणा, ह्या कार्याची वा संचालनालयाच्या अस्तित्वाचीही दखल घेतली नाही. मुंबई उच्च न्यायालयाची जी मराठी समिती कार्यरत आहे त्या समितीनेही या विषयावर चर्चा करण्यासाठी भाषा संचालनालयाला बोलावले नाही. उच्च न्यायालय आदेश देते आणि संचालनालय 'अनुपालन' करते, हा एक शासकीय व्यवहार झाला. त्याच्या पलीकडे जाऊन, दोन शासकीय संस्था एकत्र येऊन न्यायव्यवहारात मराठीचा वापर कसा वाढवता येईल याचा विचार करू शकतील ही कल्पनाच कोणाच्या डोक्यात येत नाही. दुसरीकडे एखाद्या अशिक्षित खेडुतास आपल्या दिवाणी दाव्याचा निकाल आपल्या बाजूने लागला आहे की विरुद्ध बाजूने हे जाणून घेण्यासाठी एखाद्या सुशिक्षिताचे (इंग्रजी येणाऱ्या) पाय धरावे लागतात!

शास्त्रीय परिभाषेचा फारसा वापर माध्यमांमध्ये होत नाही, पण न्यायिक परिभाषेचा मात्र होतो. न्यायव्यवहारात रिलीफला अनुतोष, स्टेला स्थगनादेश, डिक्रीला हुकूमनामा, कॅव्हिएटला सावधानपत्र, अ‍ॅक्विटलला दोषमुक्ती असे सोपे व सुंदर पर्याय निर्माण केले आहेत. अ‍ॅग्रिमेंट म्हणजे करार आणि कॉन्ट्रॅक्ट म्हणजे संविदा, लॉ म्हणजे कायदा आणि अ‍ॅक्ट म्हणजे अधिनियम असा भेदही दर्शविला

आहे. परंतु एवढ्या काळजीपूर्वक तयार केलेल्या परिभाषेची माध्यमे काहीही कदर करीत नाहीत. कायद्याचे अभ्यासक विद्यार्थी, त्यांचे शिक्षक, न्याययंत्रणेतील अधिकारी - कोणाच्याच तोंडी योग्य शब्द नाहीत. ऐटीत उभे राहून 'आर्टिकल्स ऑफ द कॉन्स्टिट्यूशन' वगैरे बोलणारा वकीलवर्गदेखील मराठी बोलताना 'संविधानाचे अनुच्छेद' असं न म्हणता 'घटनेची कलमे' वगैरे भोंगळ भाषाच वापरतो. प्रसारमाध्यमे व न्याययंत्रणेतील घटक यांनी ही भाषा न वापरल्यामुळे संचालनालयाचे हे कार्यदेखील व्यर्थ गेले आहे.

विधिअनुवाद व परिभाषा सल्लागार समिती - ही समिती, निवृत्त न्यायमूर्ती चंद्रशेखर धर्माधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली १९९४मध्ये स्थापन करण्यात आली. १९९७मध्ये तिची पुनर्रचना करण्यात आली. परंतु ही समिती विशिष्ट कालावधी उदा० सहा महिने वा एक वर्ष एवढ्याचसाठी नेमण्यात येई व तेवढा कालावधी संपल्यावर तिला मुदतवाढ दिली जाई. दि० १ एप्रिल २००४पासून तिला 'कायमस्वरूपी' मुदतवाढ देण्यात आली. तेव्हा काढलेल्या शासननिर्णयात 'राज्यातील न्यायदानात मराठीचा वापर करण्याच्या दृष्टीने, केंद्रीय व राज्य शासनातर्फे करण्यात आलेले विद्यमान तसेच भविष्यकाळात मंजूर करण्यात येणारे अधिनियम/नियम इ०चा अचूक मराठी अनुवाद उपलब्ध व्हावा या दृष्टीने समितीस कायमस्वरूपी मुदतवाढ देण्यात येत आहे.' असे म्हटले आहे. वरील वाक्य, शासकीय भाषा म्हणून तर नमुनेदार आहेच, पण 'कायमस्वरूपी मुदतवाढ' ह्या वाक्यप्रयोगाचा अर्थही स्पष्ट होत नाही. याचा अर्थ 'पर्पेच्युअल सक्सेशन अँड कॉमन सील' असलेले कायमस्वरूपी मंडळ असा आहे का? पण तसे म्हणावे तर पुढील अध्यक्ष व सदस्य निवडण्याची पद्धत काय असेल हे शासन-निर्णयात स्पष्ट केलेले नाही.

दुसरे असे की राज्य अधिनियमांच्या संबंधात मराठी अधिनियम हे अनुवाद नसून मूळ पाठ (ओरिजिनल टेक्स्ट) मानले जातात आणि ते प्रकाशित करण्याची जबाबदारी विधी व न्याय विभागाची आहे. केंद्रीय अधिनियमांच्या संबंधात, त्यांचा अनुवाद करण्याची जबाबदारी भाषा संचालनालयाची असून, ते प्रकाशित करण्याची जबाबदारी राजभाषा खंड, विधायी विभाग, नवी दिल्ली यांची आहे. राजभाषा खंड, निवडक केंद्रीय अधिनियमांचा, सर्वच भारतीय भाषांमधील अनुवाद प्रकाशित करीत असतो आणि अनुवादावर राष्ट्रपतींची स्वाक्षरी घेऊन त्याला प्राधिकृत पाठ (ऑथॉरिटेटिव्ह टेक्स्ट) म्हणून मान्यता देतो. ही व्यवस्था विधि अनुवाद समिती सुरू होण्याआधीपासून अस्तित्वात आहे. बरे, समितीचे स्थान ह्या यंत्रणेच्या चौकटीमध्ये कुठे आहे आणि तिने करावयाच्या अचूक मराठी अनुवादाची





अनुक्रमणिका

अधिकृतता काय असेल आणि तो कुणाला उपलब्ध करून द्यायचा - न्याययंत्रणेला, शासनाला की जनतेला - हे कुठेही स्पष्ट केलेले नाही. त्यामुळे काही विसंगती उद्भवतात. गेल्या सुमारे तीन वर्षांपासून समिती केवळ केंद्रीय अधिनियमांच्या अनुवादाचे काम करीत आहे. हा अनुवाद मुळात भाषा संचालनालयातील अनुवादकांनी केलेला असतो. समितीच्या महिन्यातून तीन दिवस चालणाऱ्या बैठकींमध्ये तो तपासला जातो. त्यानंतर पुढे तो पुस्तकरूपाने प्रकाशित होण्यापर्यंतची प्रक्रिया (ज्यामध्ये १०-१५ टप्प्यांचा समावेश आहे) भाषा संचालनालयाकडूनच पूर्ण केली जाते. अधिनियमांची मराठी संहिता अधिकाधिक निर्दोष होण्यासाठी तीवरून पुन्हापुन्हा हात फिरवला जातो. म्हणजे समितीने तपासलेल्या संहितेमध्ये बदल होणे ओघाने आलेच. परिणामी, समितीच्या अध्यक्षांना जरी लाल दिव्याची गाडी देण्यात आली असली, तरी प्रत्यक्षात त्यांचे स्थान भाषा संचालनालयामधील वर्ग दोन अधिकाऱ्याच्याही खालचे ठरते. समितीला स्वतःची आस्थापना नाही. भाषा संचालनालयाचा कर्मचारीवर्ग समितीसाठी वापरला जातो. संचालनालयाच्या एकूण वार्षिक अनुदानापैकी, कर्मचाऱ्यांना वेतन दिल्यानंतर व इतर आस्थापना-खर्च केल्यानंतर अत्यल्प रक्कम भाषा-विकास कार्यासाठी शिल्लक राहते. त्यामधून समितीच्या बैठकांवर खर्च करणे (सदस्य संख्या सुमारे २०) आणि आपल्या तुटपुंज्या कर्मचारी वर्गाला बैठकींचे आयोजन आदि कार्यांसाठी समितीच्या दिमतीला देणे संचालनालयाच्या जिवावर येत असल्यास नवल नाही.

अशा रीतीने, विधि अनुवाद समितीमध्ये भाषा संचालनालयाचेच काम पुन्हा केले जाते व त्याचा जादा भार संचालनालयावर निष्कारण पडतो. वस्तुतः भाषा संचालनालयाची कार्यकक्षा जेथे संपते, तेथून समितीची कार्यकक्षा सुरू व्हायला हवी. समितीने व संचालनालयाने मिळून तयार केलेली न्यायिक परिभाषा प्रत्यक्ष न्यायव्यवहारात उतरविण्याचे काम (जे संचालनालयाच्या अखत्यारीत येत नाही) समितीने करायला हवे. पण असे घडत नाही. न्याययंत्रणा, कायद्याचे शिक्षण देणारी विद्यापीठे व भाषा संचालनालय ह्या तिघांची तोंडे तीन दिशांना आहेत. त्यांना एकत्र आणून समितीने कधीही त्यांच्याशी चर्चा केली नाही. दोन वर्षांपूर्वी न्यायव्यवहार कोशाची सुधारित आवृत्ती प्रकाशित करून समितीने न्यायिक परिभाषा तयार करण्याचे एक चांगले काम केले आहे; परंतु त्याशिवाय न्यायालयीन व्यवहारात मराठीचा वापर कसा वाढवावा किंवा प्रसारमाध्यमांना प्रमाण न्यायिक परिभाषा वापरण्यास कसे प्रवृत्त करावे याबद्दल कुठलाही ठोस विचार वा कार्यक्रम समितीकडे नाही.

**मराठी समाज** - भाषा संचालनालयाची घसरण होण्यासाठी, मराठी समाजदेखील कारणीभूत आहे. या समाजाने गेल्या दोन पिढ्यांपासून, आपली भाषा व संस्कृती यांच्याकडे सरळ पाठ फिरवली आहे. आपल्या मराठीपणाबद्दल प्रचंड न्यूनगंड हा समाज बाळगतो. मराठीत बोलायची तर इतकी लाज वाटते, की काही विचारूच नका. महाराष्ट्रातील मोठ्या शहरांमधील अनेक मराठी कुटुंबांमध्ये मुदलात मराठी बोललीच जात नाही. मग पुढे जाऊन वाचन, लेखन, चिंतन, मनन, व्याकरणाची रचना, बोलीभाषांचा अभ्यास, संपूर्ण महाराष्ट्रभर बोलली जाऊ शकेल अशी प्रमाणित भाषा घडविणे, तिच्या लेखन-वाचनाचे नियम तयार करणे इत्यादी गोष्टींचा विचारच कोण करतो? वर्ष १९७५मध्ये १०+२+३ हा आकृतिबंध आला. तेव्हापासून गुणांचे स्तोम फारच वाढले. भाषाविषयातही वस्तुनिष्ठ प्रश्न विचारले जाऊ लागले व भरपूर गुण मिळू लागले. हुशार विद्यार्थ्यांनी विज्ञानच शिकायचे आणि 'ढ' मुलांनी भाषा व इतर मानविकी शास्त्रे - अशीच पद्धत पडली. पुढे २००२मध्ये तर मराठी न घेता बारावी उत्तीर्ण होता येऊ लागले. 'काय करायचे मराठी शिकून?'चा प्रवास पुढे 'काय करायचे मराठीतून तरी शिकून'कडे झाला. आज महाराष्ट्रातील तालुका स्तरापर्यंत इंग्रजी माध्यमाच्या शाळा आहेत. ज्यांना मातृभाषाच चांगली येत नाही, ते अन्य भाषा शिकू शकत नाहीत हा सिद्धान्त आपण विसरून गेलो आहोत. आज इंग्रजी शाळांमध्ये शिकायला विद्यार्थ्यांचा लोंढा येत आहे. पण इंग्रजी चांगले येणारे शिक्षक कुठे आहेत? त्यामुळे शालेय शिक्षण म्हणजे पाठांतर, पोपटपंची आणि विचार न करता येणे (विचारहीनता) असा अर्थ झाला आहे. भाषा संचालनालयात जे काम केले जाते, ते तेथील कर्मचारी करतात हे तर उघड आहे. आता समाजातील भाषेचे महत्त्व ओसरल्यावर चांगले कर्मचारीही मिळणे अवघड झाले आहे. खरे तर भाषेतही चांगले कार्य करता येते; कार्य करता आले नाही, तरी 'करियर' तर नक्कीच करता येते. पण लक्षात कोण घेतो?

**भाषा संचालनालयातील अंतर्गत कलह** - डॉ० न०ब० पाटील हे विद्वान भाषासंचालकांच्या मालिकेतील शेवटचे संचालक. ते १९८६मध्ये निवृत्त झाले. त्यानंतरचे भाषासंचालक हे सर्वांत तरुण संचालक होते. त्यामुळे त्यांना सर्वांत अधिक कार्यकाळ मिळाला. ते भाषा-सहसंचालकाच्या पदावर काही काळ होते व तेथून पदोन्नत होऊन संचालक झाले. त्यानंतर भाषा-सहसंचालकाच्या पदावर कोणाचीही नियुक्ती झाली नाही व पुढे ते पदही व्यपगत झाले. तसेच त्यांच्या काळात कर्मचाऱ्यांना नियमित व स्वाभाविक पदोन्नत्या मिळाल्या नाहीत. वर्ग तीनच्या कर्मचाऱ्यांकडून त्यांना १०% अतिरिक्त प्रभार देऊन वर्ग दोनची कामे करून घेण्याची पद्धत सुरू झाली. दहा टक्के प्रभार म्हणजे वरच्या पदाचे १००%



अनुक्रमणिका

काम, १०% जादा पगार देऊन करून घेणे. या पद्धतीमुळे पदोन्नती देण्याची निकड कमी झाली. या संचालकांनी विभागीय परीक्षा घेण्यास सुरुवात केली. ह्या परीक्षा उत्तीर्ण होणे पदोन्नतीसाठी अनिवार्य केले. परिणामी चांगल्या अनुवादकाची कसोटी भाषेची जाण वा निर्दोष अनुवाद ही न राहता, परीक्षा उत्तीर्ण होणे, ही झाली. उत्तीर्ण होण्याचे अभ्यासाव्यतिरिक्त 'अन्य' मार्ग, 'हुशार' कर्मचाऱ्यांनी शोधून काढले. या संचालकांच्या कार्यकाळात जुने, जाणते लोक कार्यालय सोडून गेले. नवीन भरती/पदोन्नती दिली गेली नाही. अनेक पदे कमी झाली. 'यथा राजा तथा प्रजा' या न्यायाने संचालनालयाचा सरासरी स्तर खाली आला.

संचालनालयात ८८ साली अनुवादकांची सेवाभरती झाली होती. त्यानंतर ९३ साली मोठ्या प्रमाणावर भरती करण्यात आली. तेव्हापासून आजपर्यंत रीतसर (लोकसेवा आयोगातर्फे) फक्त तीन अनुवादकांची नियुक्ती झाली; त्यांपैकी दोन आज कार्यरत आहेत. वरच्या पदांच्या ५-७ जाहिराती लोकसेवा आयोगातर्फे प्रकाशित झाल्या. मात्र १९८७पासून आजपर्यंत जाहिरातीला अनुसरून (नामनिर्देशनाने) केवळ एक नियुक्ती झाली. (१९८८ साली सहायक भाषा-संचालक म्हणून). बाकी सर्व जाहिराती वांझोट्या ठरल्या.

साधारणपणे वर्ष २००० व तद्नंतर निवृत्त होणाऱ्या पिढीने कळत-नकळत एक चूक केली. ती म्हणजे त्यांनी नवीन येणाऱ्या अनुवादकांना प्रशिक्षण दिले नाही. अनुवाद हे अत्यंत कौशल्याचे व कष्टसाध्य काम आहे. अनुवादशास्त्र विद्यापीठामध्ये शिकवले जात नाही. संचालनालयातही त्याचे औपचारिक प्रशिक्षण दिले जात नाही. वरिष्ठांनी नवीन अनुवादकांना शिकवावे अशी अपेक्षा असते. त्यांनी सन १९८८-९०मध्ये भरती झालेल्या अनुवादकांना प्रशिक्षण दिले असते आणि कामाची गोडी लावली असती, तर आजचे चित्र कदाचित वेगळे दिसले असते. कारण पूर्वीच्या पिढीला ज्या प्रकारचे भाषाशिक्षण मिळाले, तसे नंतरच्या पिढीला मिळालेले नाही.

वर नमूद केलेल्या सगळ्या घटकांचा परिणाम साधारण २०००नंतर संचालनालयाची प्रकृती पार ढासळण्यामध्ये झाला. काम न करता आणि कार्यालयाची शिस्त न बाळगता केवळ पगार व इतर लाभ घेणाऱ्या कर्मचाऱ्यांची संख्या वाढली. सुरुवातीला त्यांच्याकडे दुर्लक्ष करण्यात आले आणि आता तर अशी परिस्थिती आहे की त्यांच्यावर कोणतीही कारवाई होणेच शक्य नाही. चांगल्या लोकांचे गट बनत नाहीत आणि वाममार्गींचे गट काहीही झाले तरी फुटत नाहीत ही तर जगरहाटीच आहे. त्यानुसार, संचालनालयातील अशा गटांचे प्राबल्य

दिवसेंदिवस वाढत आहे. ह्या गटांच्या बाहेर राहणे याचा अर्थ त्यांच्याशी वैर असणे असाच लावला जातो. अशा रीतीने वैर पत्करून असुरक्षितता विकत घेण्यासाठी आज संचालनालयातील शहाणेसुरते लोकदेखील तयार नाहीत. सर्व सत्ता आता या गटप्रमुखांच्या हातात आहे. शिवाय, इतक्या वर्षांच्या अराजकामध्ये प्रत्येकावर काही ना काही 'अन्याय' झालेलाच आहे. ह्या अन्यायाची बारीकशी ठिणगी जरी कुणाच्या मनात आढळली, तरी तिला फुंकर घालून त्यामधून असंतोषाची आग भडकविण्यासाठी हे लोक आपले वाक्पटुत्व खर्ची घालत आहेत आणि अशा गटांमध्ये सामील होऊन आपले स्थान सुरक्षित करण्यानेच आपल्यावरील अन्यायाचे परिमार्जन होते असे म्हणून कर्मचारी स्वत:ची समजूत घालीत आहेत. ह्या गटबाजीला कधीकधी जातीय रंग चढवला जातो. हे गट जातिनिहाय असतातच असे नाही, परंतु राजकारणासाठी जातीचा वापर केला जातो.

अशा परिस्थितीत भाषा संचालनालयातील अनेक कर्मचाऱ्यांना, नोकरीपुरती नोकरीही करणे अशक्य झाले आहे. ज्यांच्याकडे चांगला अनुवाद करण्याची इच्छा व पात्रता आहे त्यांच्याकडेही कामावर लक्ष केंद्रित करण्यासाठी लागणारे मानसिक स्थैर्य नाही. इतरांची तर गोष्टच सोडा. शासकीय कर्मचाऱ्यांना, शासनाच्या विरोधात जायचे नाही अशी पक्की शिकवण दिलेली असते. त्यामधून त्यांची एक पराभूत, निष्क्रिय मानसिकता तयार होते. आपद्धर्म म्हणून ते संघटनांमध्ये सामील होतात. 'आपण बरं की आपलं काम बरं' असं म्हणून स्वत:भोवती घट्ट कोश विणून घेतात, तर कधी हडेलहप्पी करणाऱ्यांना शरण जातात, पण चांगल्या लोकांनी एकत्र येऊन, ज्यामध्ये काम करण्याचा आनंद मिळेल असे वातावरण इथे तयार करावे - करता येईल - केले पाहिजे - हे त्यांना माहीतच नाही.

'मराठी अभ्यासकेंद्रा'चे अध्यक्ष दीपक पवार ह्यांना १ मे २००९ रोजी राजभाषा दिनाच्या कार्यक्रमासाठी भाषा संचालनालयात प्रमुख पाहुणे म्हणून बोलविण्यात आले होते. त्या वेळी संचालनालयाचा उज्ज्वल वारसा व दारुण सद्यस्थिती याची त्यांना कल्पना आली. बॅचलर ऑफ मास मीडियाच्या मराठी माध्यमाच्या अभ्यासक्रमासाठी संचालनालयाने आपला वृत्तपत्र-विद्या परिभाषा कोश तातडीने पुनर्मुद्रित करून द्यावा अशी मागणी म०अ० केंद्राने केली होती, तिलाही समाधानकारक उत्तर मिळाले नव्हते. ह्या पार्श्वभूमीवर केंद्राने माहितीच्या अधिकाराखाली संचालनालयाची माहिती मागविली. ह्या माहितीमधून भाषा संचालनालयाची दुरवस्था उजेडात आली. ह्या माहितीच्या आधारे केंद्राने प्रसार-माध्यमांमधून मोहीम उघडली. बातम्यांच्या आधारे विधानमंडळात विरोधी पक्ष सदस्यांनी शासनाला प्रश्न विचारले. भाषा-संचालकांची नियुक्ती लवकरच केली



अनुक्रमणिका

जाईल असे आश्वासन शासनाला द्यावे लागले (डिसेंबर २००९). दुर्लक्षित विषयावरील चर्चेस थोडे तोंड फुटले.

दि० २२ जानेवारी २०१०ला मराठी अभ्यास केंद्राने, भाषासंचालक गो०ग० आल्हाट यांना पत्र लिहून शिष्टमंडळाच्या भेटीसाठी वेळ मागितली. ह्या शिष्टमंडळात केंद्राचे पदाधिकारी व प्रसारमाध्यमांचे प्रतिनिधी यांचा समावेश असणार होता. प्रथम संचालकांनी भेट देण्याचीच टाळाटाळ केली. शेवटी बराच पाठपुरावा केल्यावर व भेट न दिल्यास उपोषण, धरणे केले जाईल असे सांगितल्यावर त्यांनी म०अ० केंद्राच्या पदाधिकाऱ्यांची भेट घेण्याचे कबूल केले. त्यावर पदाधिकाऱ्यांची भेट नव्हे तर शिष्टमंडळाला भेटण्याचे ठरले होते म्हणून केंद्राने पुन्हा ठासून सांगितल्यावर संचालकांनी भेट देण्याचे कबूल केले व दि० ३ एप्रिल २०१०ला ही भेट झाली.

भेटीमध्ये शिष्टमंडळाने संचालकांशी चर्चा करून, पूर्णकालिक भाषा-संचालकांची नियुक्ती, अनुवादकांच्या रिक्त जागांवर भरती, मुद्रणबाह्य (आउट ऑफ प्रिंट) प्रकाशने लवकरात लवकर उपलब्ध करून देणे, भाषा संचालनालयाच्या परिभाषेचा वापर शासकीय संस्था व प्रसारमाध्यमे यांच्यावर बंधनकारक करणे इत्यादी ११ मागण्या त्यांच्यासमोर ठेवल्या. अडीच महिने कसून तयारी केल्यावरही भाषासंचालक ह्या भेटीमध्ये काहीच ठोस उत्तर देऊ शकले नाहीत. ''मी नवीन आहे व संचालनालयाचा आवाका मोठा आहे'' ''कार्यवाही चालू आहे'', ''प्रस्तावित आहे'', ''निधी मिळण्यावर अवलंबून आहे'', ''वरिष्ठांना विचारावे लागेल'' अशी तद्दन 'सरकारी' उत्तरेच त्यांना द्यावी लागली. तथापि, तेथे जी काही चर्चा झाली, तीमधून पुढील बाबी स्पष्ट झाल्या.

१) अनुवादकांच्या पदांसाठी २००४मध्ये महाराष्ट्र लोकसेवा आयोगाला मागणीपत्र पाठवले आहे. त्यावर २००८ साली कार्यवाही सुरू झाली. दोनशे अर्ज आले आहेत. मात्र अद्याप एकही नियुक्ती झालेली नाही.

२) भाषासंचालकाच्या पदासाठी अपेक्षित शैक्षणिक अर्हतेचे उमेदवार मिळत नाहीत म्हणून अर्हतेच्या अटी शिथिल करण्यासाठी शासनाकडे प्रस्ताव पाठवला आहे.

३) संचालनालयाचा खर्च हा योजनेतर (नॉन प्लॅन) अनुदानातून भागवला जातो. (याचा अर्थ असा, की संचालनालयाकडे विकासात्मक काम करणारी यंत्रणा म्हणून सामान्य प्रशासन विभाग पाहातच नाही.)

४) वित्तीय वर्ष २००९-१०मध्ये संचालनालयास ३,२५,९५,००० रुपयांचा

निधी उपलब्ध झाला. त्यामधून कर्मचाऱ्यांचे वेतन व इतर आस्थापना-खर्च वजा जाता, मराठीच्या विकासासाठी अत्यल्प रक्कम शिल्लक राहते.

५) भाषा संचालनालयाच्या ४३ प्रकाशनांपैकी सध्या बहुतांश प्रकाशने मुद्रणबाह्य आहेत. त्यांपैकी अर्थशास्त्र, स्थापत्य अभियांत्रिकी, वाणिज्य, शासन-व्यवहार कोश, शारीर आणि विद्युत अभियांत्रिकी हे सहा कोश २००५मध्ये पुनर्मुद्रणासाठी पाठवले आहेत. परंतु, मजकूर छपाईसाठी पाठवणे, मुद्रितवाचन इ० कामांचा विचार करता एका कोशाच्या पुनर्मुद्रणाला ७ ते ८ वर्षे लागतात असा आतापर्यंतचा अनुभव आहे. अग्रक्रमाने ही छपाई करून घेण्याची कोणतीही योजना (काम बाहेर देणे इ०) संचालनालयाकडे नाही.

दि० १७ एप्रिल २०१० रोजी म०अ० केंद्राने मुख्यमंत्र्यांची भेट घेऊन ह्या विषयावर त्यांच्याशी चर्चा केली, व आपल्या मागण्या त्यांच्यासमोर मांडल्या. ह्यामध्ये भाषा संचालनालय सा०प्र०वि०कडून काढून घ्यावे, 'राजभाषा विभाग' म्हणून एक नवीन विभाग शासनांतर्गत स्थापन करावा आणि संचालनालयाबरोबरच विश्वकोश-निर्मिती मंडळ, म०रा० साहित्य व संस्कृती मंडळ, राज्य मराठी विकास संस्था इत्यादी संस्थांचा कारभार त्याकडे सुपूर्द करावा अशी भाषा विकासाच्या दृष्टीने मूलभूत मागणी करण्यात आली. तसेच, भाषा-संचालकांच्या नियुक्तीची व परिभाषा कोश अद्ययावत करण्याच्या दृष्टीने भाषा-सल्लागार मंडळाची पुन:स्थापना करण्याचीही मागणी करण्यात आली आहे. मुख्यमंत्र्यांनी यांपैकी बहुतांश मागण्या मान्य करून, त्या तातडीने दि० १ मे २०१०पर्यंत पूर्ण करण्याचे व संचालनालयाच्या निधीमध्ये भरघोस वाढ करण्याचे आश्वासन दिले.

यांपैकी आज स्वतंत्र भाषाविभाग व भाषा-सल्लागार समिती यांची स्थापना झाली. भाषा-सल्लागार समितीमध्ये लेखक-कवी, मराठी वाङ्मयाचे प्राध्यापक ह्यांचाच भरणा आहे. प्रत्यक्षात मात्र, शासनव्यवहारात, न्यायव्यवहारात व ज्ञानभाषा म्हणून मराठीची प्रतिष्ठापना करणे ही वेगळी गोष्ट आहे. समिती-सदस्यांमध्ये ह्या विषयाचे अभ्यासक व हितचिंतक असल्याचे दिसत नाही.

■

ई-पत्ता - amohoni@yahoo.co.in

# बहुपदी क्रियापदे आणि त्यांचे ‘अर्थ’कारण

**अनघा भट-बेहरे**

प्रस्तुत लेखात वापरलेल्या संज्ञा :

| | |
|---|---|
| १) क्रियाव्याप्ती | क्रियापदांना लागू असणारी एक व्याकरणिक कोटी. क्रियेकडे बघण्याचा दृष्टिकोन उपलब्ध करून देणारी ही कोटी हा एक प्रकारचा व्हर्बल कॅमेरा (verbal camera) आहे असे म्हणता येईल. पूर्ण व अपूर्ण ह्या द्वैतातूनच आपल्याला क्रियाव्याप्ती समजावून घेता येते. |
| २) सान्त क्रियापदे | अथवा टेलिक क्रियापदे (telic verbs) म्हणजे ज्या क्रियापदांच्या अर्थामध्येच त्यांचे एका शेवटपर्यंत जाऊन संपणे अनुस्यूत असते अशी क्रियापदे. |
| ३) न-सान्त क्रियापदे | ज्या क्रियापदांच्या अर्थामध्ये त्यांच्या शेवटापर्यंत जाऊन संपण्याचे सूचन नसते अशी क्रियापदे. |
| ४) चल क्रियापदे | एखाद्या वस्तूचे अवकाशातून एका बिंदूपासून दुसऱ्या बिंदूपर्यंत स्थानांतर दर्शवणारी क्रियापदे. |
| ५) अचल क्रियापदे | एखाद्या अवस्थेचे, स्थितीचे किंवा क्रियेचे वर्णन करणारी क्रियापदे. |
| ६) सदिश क्रियापदे | वस्तूचे अवकाशातील स्थानांतरण कोणत्या दिशेला होते हे दर्शवणारी चल क्रियापदे. |
| ७) अदिश क्रियापदे | वस्तूचे अवकाशातील स्थानांतर कोणत्या दिशेने होते याबद्दल कोणताही निर्देश न करणारी क्रियापदे. |

१. अपूर्ण आणि पूर्ण क्रियाव्याप्तीच्या अभिव्यक्तीसाठी मराठीमध्ये ऊन कृदन्त व दुय्यम क्रियापदाची योजना केली जाते, हे आपण गेल्या लेखात पाहिले (२८.२, उन्हाळा २०१०). ऊन कृदन्ताच्या क्रियापदाचा अर्थ अधोरेखित करणारे अथवा ते ऊन कृदन्त वर्णन करत असलेल्या क्रियेला एक मर्यादा घालणारे क्रियापद दुय्यम (ऑग्झिलरी) म्हणून वापरले जाते. केवळ भूत, वर्तमान आणि भविष्य अशा तीन काळांमध्ये एकपदी क्रियापदे वापरल्यास काळाची नेमकी अभिव्यक्ती होऊ शकत

नाही. काळ आणि अवकाश ह्या दोन मितींमध्ये क्रिया नेमकी कशी घडली याचे वर्णन करण्याच्या दृष्टीने पूर्ण क्रियाव्याप्तीदर्शक क्रियापदे अधिक सक्षम असतात.

१.१ एकपदी क्रियापदाच्या ऊन कृदन्ताला जी क्रियापदे दुय्यम या स्वरूपात जोडली जातात, ती सहसा सान्त असतात. म्हणजेच ती वर्णन करत असलेल्या क्रियेचा एका निश्चित शेवटापर्यंत प्रवास त्यांच्या अर्थामध्येच अंतर्भूत असतो. सान्त क्रियापदे एका मर्यादित कालखंडात उलगडत जाऊन शेवटापर्यंत येतात आणि संपतात. याउलट न-सान्त क्रियापदे कितीही मोठ्या कालखंडापर्यंत उलगडत राहू शकतात. त्यांच्या अर्थामध्ये त्यांचे शेवटापर्यंत जाऊन संपणे अंतर्भूत नसते. या अर्थाने त्यांना अंगभूत मर्यादा नसते. खाली दिलेला तक्ता पाहिल्यास सान्त आणि न-सान्त क्रियापदे कोणती याचा बोध होऊ शकेल.

**तक्ता क्र० १**

| सान्त क्रियापदे | न-सान्त क्रियापदे |
|---|---|
| सोडणे | करणे |
| टाकणे | बोलणे |
| देणे | ऐकणे |
| घेणे | जेवणे |
| ठेवणे | राहणे |
| काढणे | बसणे |

१.१.२ वरील तक्त्यामध्ये समाविष्ट असलेली सर्व सान्त क्रियापदे ऊन कृदन्तांच्या जोडीने दुय्यम क्रियापदे म्हणून वापरली जातात. तयार होणारे बहुपदी क्रियापद पूर्ण क्रियाव्याप्तीदर्शक असते. पुढील काही उदाहरणांवरून हा मुद्दा स्पष्ट होईल.

(अ) साऱ्या रूढ आणि अरूढ घटनांना ती एकाच पातळीवर आणून सोडते. (दुर्गा भागवत)

(आ) मला वाटते या आत दडपून टाकलेल्या मनाचा कोंडमारा होत होता. (विश्राम बेडेकर)

(इ) याने याचे यवतमाळचे कविमित्र वामन नारायण देशपांडे यांच्याकडे कौतुकाने पाठवून दिली. (विश्राम बेडेकर)



अनुक्रमणिका

(ई) त्यानं माझ्याजवळचं ते पिल्लू ओढून घेतलं. (प्रकाश नारायण संत)

(उ) ओतून ठेव माझ्या कपात. (राम पटवर्धन)

(ऊ) त्यात 'मध्यकाल' म्हणून ऐतिहासिक कादंबरीचे दोन-तीन हप्ते लिहून काढले. (विश्राम बेडेकर)

१.१.३ तक्ता क्र० १मध्ये दिलेल्या काही न-सान्त क्रियापदांचीही योजना अनेकदा बहुपदी क्रियापदांमध्ये होताना दिसते. तयार होणारी बहुपदी क्रियापदे ऊन कृदन्त निर्देश करत असलेल्या क्रियेला अंतर्गत मर्यादा घालण्याऐवजी क्रिया दीर्घकाळ चालू राहिलेली असल्याचे सूचित करतात. क्रियेला जणू एक निरंतरता प्रदान करतात. नमुन्यादाखल पुढील उदाहरणे पाहा :

(अ) मध्यंतरी बराच मोठा काळ थांबून राहिलेलं माझं लेखन पुन्हा सुरू होऊ शकलं, याचा मला मोठा आनंद होता. (प्रकाश नारायण संत)

(आ) त्यातला शाळकरी वयाचा 'लंपन' वर्षानुवर्षं मनात घर करून बसला होता. (पु०ल० देशपांडे)

(इ) आणि ते मन हळुहळू आत जाऊन शेवटी उरात दडून बसले. (विश्राम बेडेकर)

१.२ बसणे आणि राहणे ही न-सान्त क्रियापदे क्रियेची निरंतरता, क्रियेचे सातत्य व्यक्त करण्यासाठी ताख्यातांसमवेतही वापरली जातात. जसे : ऐकत राहणे; ऐकत बसणे; पाहत राहणे, पाहत बसणे; वाचत बसणे, वाचत राहणे इत्यादी. बसणे आणि राहणे हीच न-सान्त क्रियापदे ऊन कृदन्तांसोबत दुय्यम क्रियापदे म्हणूनही वापरली जातात. अनेकदा अशा प्रकारे तयार होणारे बहुपदी क्रियापद हे पूर्ण क्रियाव्याप्तीदर्शक आहे असे वाटते. परंतु *बसणे* आणि *राहणे* ही क्रियापदे ऊन कृदन्त वर्णन करत असलेली क्रिया अद्यापही चालू आहे असे दर्शवतात. जणू क्रियेची अंगभूत मर्यादा काढून टाकतात. जसे :

(अ) भरून राहणे

(आ) जाऊन बसणे

(इ) चढून बसणे

(ई) निजून राहणे

(उ) दडून बसणे

(ऊ) कवटाळून राहणे

(ए) चिकटून राहणे

(ऐ) अडकून राहणे

(ओ) गमावून बसणे

१.३) वरील सर्व बहुपदी क्रियापदे ऊन कृदन्त वर्णन करत असलेली क्रिया पुढे चालू असल्याचे सूचित करतात. जसे : भरून राहणे : भरलेल्या अवस्थेत असणे; कवटाळून राहणे : कवटाळलेल्या अवस्थेत असणे; गमावून बसणे : कायमस्वरूपी गमावणे; चढून बसणे : चढलेल्या अवस्थेत राहणे इत्यादी.

२) पूर्ण क्रियाव्याप्तीदर्शक बहुपदी क्रियापद तयार होताना दुय्यम क्रियापदाचा अर्थ महत्त्वाची भूमिका बजावतो. अगोदर पाहिल्याप्रमाणे दुय्यम क्रियापद बहुपदी क्रियापदाला एक अंगभूत मर्यादा उत्पन्न करते. त्यामुळे सान्त क्रियापदे (पाहा तक्ता क्र०१) वरचेवर दुय्यम क्रियापदाच्या भूमिकेत वापरलेली आढळतात.

सान्त क्रियापदांच्या सोबतच सदिश क्रियापदेसुद्धा दुय्यम क्रियापदे म्हणून पूर्ण क्रियाव्याप्तीदर्शक बहुपदी क्रियापदांत वापरली जातात. पूर्ण क्रियाव्याप्तीच्या निर्मितीतील सदिश क्रियापदांची भूमिका आता आपण पाहू.

२.१) क्रियापद या गटाचे शब्द त्यांच्या मूलभूत अर्थानुसारच चल असतात. क्रियापदे विविध हालचाली, घटना, वस्तूचे अवकाशातून होणारे स्थानांतर आणि विविध अवस्थांचे वर्णन करतात. त्यामुळेच ती काल आणि अवकाश ह्या दोन मितींशी निबद्ध असतात. अगदी स्थितीचा निर्देश करणारी, एखादी अवस्था वर्णन करणारी क्रियापदे जसे : *बसणे, राहणे,* असणे इत्यादीसुद्धा कालाशी निगडीत असतात. जी क्रियापदे एखाद्या वस्तूचे अवकाशातील स्थानांतर दाखवतात, ती क्रियापदे 'चल' प्रकारची क्रियापदे असतात. उदाहरणार्थ पुढील तक्ता पाहू :

**तक्ता क्र० २**

| चल क्रियापदे | अचल क्रियापदे |
|---|---|
| पळणे | झोपणे |
| चालणे | बसणे |
| येणे | खोकणे |
| आणणे | वाचणे |
| नेणे | रडणे |
| पाठवणे | हसणे |

| | |
|---|---|
| चढणे | पिकणे |
| पडणे | कापणे |

२.२ वरील तक्त्यावरून असे लक्षात येईल की चल क्रियापदे वस्तूच्या एका किंवा अनेक दिशांमधील हालचाली वर्णन करतात, तर अचल क्रियापदे अवस्था, घटना किंवा स्थितीचे वर्णन करतात.

२.२.१ चल क्रियापदांचेसुद्धा सदिश आणि अदिश असे दोन प्रकार मानता येतील. काही चल क्रियापदांच्या अर्थामध्येच त्यांचा अवकाशातून होणारा प्रवास हा एकाच दिशेने (सदिश) आहे अशी स्पष्ट सूचना असते. तर काही चल क्रियापदे होणारे स्थानांतर हे कोणत्या दिशेने आहे याविषयी काहीही सांगत नाहीत. अशा क्रियापदांना आपण अदिश क्रियापदे असे म्हणू. सदिश क्रियापदे आणि अदिश क्रियापदे यांच्यातील फरक कोणता ते पुढील तक्ता पाहिल्यास समजू शकेल.

**तक्ता क्र० ३**

| सदिश चल क्रियापदे | अदिश चल क्रियापदे |
|---|---|
| जाणे | रांगणे |
| येणे | पळणे |
| नेणे | उडणे |
| आणणे | पोहणे |
| पाठवणे | धावणे |
| चढणे | चालणे |

२.३) तक्ता क्र०३ मधील सदिश चल क्रियापदे ही एखाद्या वस्तूचे अवकाशातील स्थानांतर हे एखाद्या विशिष्ट दिशेने होत आहे असे सुचवतात. अवकाशातील स्थानांतर आणि त्या स्थानांतराची दिशा ह्या दोन्ही गोष्टी त्यांच्या मूलभूत अर्थातच समाविष्ट असतात. जसे :

*जाणे* - बोलणारा अथवा लिहिणारा दाखवत असलेली वस्तू तिच्या सध्याच्या स्थानापासून दूरवर स्थानांतर करते.

*नेणे* - वस्तू तिच्या सध्याच्या स्थानापासून दूर वाहून नेली जाते.

*येणे* - एखादी वस्तू दूरवरून बोलणाऱ्या किंवा लिहिणाऱ्याच्या समीप स्थानांतर करते.





अनुक्रमणिका

*आणणे* - वस्तू तिच्या सध्याच्या स्थानापासून बोलणाऱ्या किंवा लिहिणाऱ्याच्या समीप वाहून आणली जाते.

*चढणे* - एखादी वस्तू एखाद्या स्थानापासून ऊर्ध्व दिशेला स्थानांतर करते.

२.३.१ पूर्ण क्रियाव्याप्तीदर्शक बहुपदी क्रियापद तयार करण्यासाठी मराठीमध्ये सान्त क्रियापदाप्रमाणेच सदिश चल क्रियापदेसुद्धा वापरली जातात. त्यातही *येणे* आणि *जाणे* ही दोन क्रियापदे वरचेवर आणि विविध अर्थाच्या क्रियापदांसोबत वापरली गेलेली दिसतात. त्यासाठी आपण काही उदाहरणे बघू :

(अ) मग सायकलवरून जाऊन तो ते कुठंतरी लांब सोडून आला. (प्रकाश नारायण संत)

(आ) नंतर थोडे जुजबी बोलून त्या निघूनही गेल्या. (विश्राम बेडेकर)

(इ) कधी त्याला पळून जावे लागले. (दुर्गा भागवत)

(ई) पौगंडावस्थेतील मुलांचं जग त्या कथेतून एखाद्या सुंदर चित्रपटासारखं डोळ्यांपुढून सरकून गेलं होतं. (पु०ल० देशपांडे)

(उ) असा कुत्रा तू मुद्दाम उचलून आणलास यात काहीतरी गोम आहे. (राम पटवर्धन)

(ऊ) तिसऱ्या स्कंधात दुसऱ्या अध्यायात आग्नी राजा एका अप्सरेवर भुलून जातो. (दुर्गा भागवत)

(ए) ढगाची सावली पडावी आणि निघून जावी तशी त्याची उदासी पटकन विरून जायची. (विश्वनाथ खैरे)

(ॲ) काट्यांच्या अणी, कुदळीची अणी, शेतातली वरंभे सगळी एकात एक मिसळून गेली. (विश्वनाथ खैरे)

(ऐ) मिथ्य कथांमधले संकेत/प्रतिमांचे अर्थ फार पूर्वीच ठरून गेलेले असतात. (शं०बा० जोशी)

(ओ) कालनिर्देशन करणारी ग्रामीण विधानेही अशीच लवचिक असल्याचे आढळून आले आहे. (द०ग० गोडसे)

(ऑ) त्यामुळे ही गोष्ट महाराष्ट्रात घडून येणे अगदी स्वाभाविक म्हटली पाहिजे. (सदानंद मोरे)

(औ) साप्ताहिक सकाळमधील दर आठवड्याची मैफल फारच जमून जाते. (वाचकांचा पत्रव्यवहार)

२.३.२ वरील उदाहरणांची यादी अजून खूप लांबवणे शक्य आहे. त्याचे कारण असे, की विविध तऱ्हांच्या लेखनशैलींमध्ये बहुपदी क्रियापदांचा वापर सातत्याने व अतिशय विस्तृत प्रमाणात होत असलेला आपल्याला दिसतो. किंबहुना मराठी संहितांमधील एकपदी व बहुपदी क्रियापदांच्या वापराचा संख्याशास्त्रीय आढावा घेतला तर बहुपदी क्रियापदांचा वापर कितीतरी मोठ्या प्रमाणात होत असल्याचे दिसून येईल हे नि:संशय.

३. असे असतानाही मराठी व्याकरणाने अथवा मराठीतील शब्दकोशांनी बहुपदी क्रियापदांची दखल अभावानेच घेतल्याचे आढळेल.

३.१ स्थलमर्यादेमुळे मराठीतील सर्वच बहुपदी क्रियापदांचा, त्यांच्या अर्थाचा तसेच त्यांच्या निर्मितीमागच्या सर्व कारणांचा परामर्श घेणे येथे शक्य नाही. परंतु मराठीतील बहुपदी क्रियापदांचा अधिक सखोल विचार यानिमित्ताने मराठीतील व्याकरणकारांनी करावा असे वाटते.

**संदर्भ :**


भट-बेहेरे अनघा : मराठीतील बहुपदी क्रियापदे व क्रियाव्याप्ती विचार, भाषा आणि जीवन, वर्ष २८, अंक २, उन्हाळा २०१०

Bhat Anagha : 2005. 'Aspect in Marathi and Russian : An Attempt at Comparative Analysis' Russian Language, Literature and Society - a post Perstroika Overview, ed. Vinay Totawar, Neeraja Jaiswal, CIEFL, Hyderabad.

मास्लव यू०स० (संपा०) १९६२. वप्रोसी ग्लागेल्नावा वीदा (क्रियापदांच्या व्याप्तीच्या समस्या), मॉस्को.

झोलातवा गे० आ० २००२. कातेगोरी व्रेमेनी इ वीदा स्तोच्की झेनिया त्येक्स्ता (संहितेच्या अंगाने काळ व क्रियाव्याप्ती ह्या कोटी) वप्रोसी यिझिकाझ्नानिया क्र०३


■


3, बसंत बहार अपार्टमेंट्स, 119/बी प्रभात रस्ता, पुणे 411 004.
स्थिरभाष : (020) 2544 9476, चलभाष : 098226 11969
ई-पत्ता : anaghab2@rediffmail.com


---

**शुद्धिपत्रक**

'मराठीतील बहुपदीय क्रियापदे व क्रियाव्याप्ती विचार' (भाषा आणि जीवन, वर्ष २८, अंक २, उन्हाळा २०१०) या लेखामध्ये पृष्ठ ९ वरील तक्ता क्र० १ स्तंभ ३, ओळ २ ''तो जात होता'' अशी वाचावी.

---

# मर्ढेकर आणि छंद:शास्त्र

शुभांगी पातुरकर

कै० बा०सी० मर्ढेकर हे नवकाव्याचे जनक. आशय आणि अभिव्यक्तीत त्यांनी केलेले बदल सर्वज्ञात आहेत. मात्र हे करीत असताना आधुनिक कवितेचे एक प्रमुख लक्षण असलेला मुक्तछंद मात्र त्यांनी वापरलेला नाही. ''आधुनिक काव्यध्येय, काव्यहेतू व काव्यविषय यांना जुने छंद जुळतच नाहीत'' असे मुक्तछंदाच्या चळवळीचे खंदे प्रवर्तक कवी अनिल (शके १८५३, पृ० ५६) यांचे मत होते. असे असताना मर्ढेकरांनी मात्र आपली नवी कविता रूढ छंदातून प्रकटविली. त्यांनी छंद:शास्त्रीय बदल करण्याऐवजी जुन्याच छंदांच्या घडीव पात्रातून आधुनिक विषय मांडले आणि गतानुगतिकतेच्या वलयात फिरणाऱ्या मराठी कवितेला नवे क्षितिज दाखविले. याचा अर्थ, मुक्तछंदाच्या प्रर्वतकांना जुन्या छंदांत जशा अभिव्यक्तीच्या दृष्टिकोनातून बऱ्याच अडणची जाणवल्या तशा अडचणी त्यांना जाणवल्या नाहीत का? आणि त्यामुळे त्यांना मुक्तछंदाच्या तथाकथित स्वातंत्र्याचीहीं गरज भासली नाही का? मुक्तछंदाच्या समर्थनार्थ प्रतिपादण्यात आलेली सर्व कारणे रद्दबादल ठरविण्याचे काम त्यांच्या कवितेने एकहाती केले. नवी जाणीव - नवा आशय - नवी प्रतिमा - नवी कविता त्यांनी जुन्या साच्यातून प्रकटविली. ही किमया त्यांनी नेमकी कशी साधली?

मर्ढेकरांसारख्या युगप्रवर्तक कवीच्या काव्याची मौलिकता आणि अनन्यता अनेक घटकांवर अवलंबून आहे. त्यात त्यांनी केलेल्या छंदविषयक प्रयोगांचा वाटा फार मोठा आहे. मर्ढेकरांनी रूढ अर्थाने छंदबदल जरी केले नसले तरी त्यांनी छंदप्रयोग अवश्य केले आहेत. मर्ढेकरी छंदप्रयोगांचा विचार १) आशयसापेक्ष आणि २) प्रचलित छंद:शास्त्रसापेक्ष अशा दोन अंगांनी करावा लागतो. त्यांच्या अशा प्रयोगांचा अंशत: विचार प्रा० गो०वि० करंदीकरांनी केला आहे; पण तो आशयनिष्ठ नसून अभिव्यक्तिनिष्ठ, तंत्रनिष्ठ आहे. मर्ढेकरांचे छंद:सापेक्ष प्रयोग आशयसापेक्ष आहेत. त्यात पारंपरिक काव्य मांडणीच्या तुलनेत दृश्यात्मक बदलही आहे. आशय प्रवाही करणे, आशय तोडणे, अडविणे, वळविणे, प्रभावी करणे, तिरकस करणे हे त्यातून साधलेले आहे. त्यांनी रूढ छंदांतच म्हणजे शार्दूलविक्रीडित, मंदारमाला इ० अक्षरगणवृत्तांत, पादाकुलकादी मात्रावृत्तांत आणि ओवी-अभंगादी अक्षरछंदांत सूक्ष्म बदल केले. अर्थात हे करताना त्यांनी छंदाचे

बंधन, यती, मात्रा इ० नियमांचे काटेकोर पालन केले. या छंदाची शास्त्रीयता व व्याकरणशुद्धता जपत त्यांनी त्यात वेगळ्या प्रकारचे स्वातंत्र्य व सवलती घेतल्या. विरामचिन्हे, चरणमोड, चरणजोड, कंसाचा वापर, तिरपा ठसा, यमकबांधणी, कडव्यांची रचना व त्यातील चरणसंख्या, इ० दृक्‌सापेक्ष घटकांचा यथोचित, कल्पक आणि अभिनव वापर करीत नवा आशय जुन्या छंदातून व्यक्त केला. श्री०पु० भागवत यांनी 'मर्ढेकरांची कविता' या कवितासंग्रहाच्या प्रस्तावनेत म्हटल्याप्रमाणे (पुनर्मुद्रण १९९४) 'शिशिरागमा'पासून मर्ढेकरांच्या रचनेमध्ये शब्दांचे रूप, वाक्यांची मोडणी, विरामचिन्हांचा वापर, ओळींची रचना यांच्या बाबतीत आशयाशी संवादी असा वैशिष्ट्यपूर्ण व काटेकोर साक्षेप बाळगण्याचा प्रयत्न आढळतो. म्हणूनच छंदबदल न करता आशय हवा तसा प्रभावीपणे अभिव्यक्त करणे त्यांना सहज शक्य झाले. त्यांनी आशयसापेक्षतेने केलेल्या अशा तऱ्हेच्या छंदबदलांचा सविस्तर विचार यापूर्वी मी केला आहे (१९८९ पृ० ३४-५३). मर्ढेकरांना अभिप्रेत असलेला नवा आशय व्यक्त करण्यात त्यांनी उपयोजिलेले जुने छंद कसे साहाय्यभूत झाले याचा शोध येथे घेतला आहे.

छंदविचार हा वरकरणी जरी तांत्रिक विचार असला तरी तो आशयलक्ष्यी असल्याने आकलनाला, आस्वादाला मदत करणारा आहे. छंद-आशय एकरूपता हे चांगल्या काव्याचे लक्षण असते. कवीच्या भावनिक तादात्म्याचे ते लक्षण असते. विवक्षित छंदाची त्या आशयासाठी अपरिहार्यता जाणवते हे त्या कवितेचे यश असते तसेच कवीचेही. आशयाभिव्यक्तीचे अद्वैत हे चांगल्या कवितेचे लक्षण मानण्याचे कारण असे की कोणताही छंद हा निव्वळ आशयाभिव्यक्तीचे साधन नसतो तर आशयाला आकार देण्याचे सृजनशील काम तो करीत असतो. कवितेच्या संदर्भात छंदविचार लक्षात घ्यायचा तो यासाठी.

प्रत्येक मोठ्या कवीजवळ स्वत:चा असा एक छंदविचार असतो. मर्ढेकरांजवळही तो होता. त्यांनी सुरुवातीला संस्कृतातील अक्षरगणवृत्ते वापरली. त्यांची 'शिशिरागमा'तील बहुतांश कविता वृत्तबद्धच आहे. 'काही कविता', 'आणखी काही कविता' या संग्रहांतील बहुतांश कविता मात्र पादाकुलक या (१६ मात्रांच्या) मात्रावृत्तातून तसेच ओवी, अभंग, पादाकुलक या अष्टाक्षरी अक्षरछंदांतून प्रकटली. ओवी-अभंग हा जोड शब्द आपण सर्रास वापरतो. पण त्यात वर्गवारी आहे. ओवी हा एक छंदप्रकार आहे तर अभंग हा मुळात काव्यरचनाप्रकार आहे. पृथ्वी, शिखरिणी ही जशी अक्षरगणवृत्ते आहेत; चंद्रकांत, हरिभगिनी ही जशी मात्रावृत्ते आहेत, तसा ओवी हा अक्षरछंद आहे. आणि आरती, पोवाडा, दशपदी, सुनीत हे जसे काव्यरचनाप्रकार आहेत तसा अभंग हा काव्यरचना प्रकार आहे. अभंग हा

ओवीतूनच निर्माण होतो. ओवीची निर्मिती लयतत्त्वानुसारी होते तर अभंगाची संघटनातत्त्वानुसारी होते. एक सलग अनुभूती जेव्हा चार-पाच-सहा वा अधिक ओव्यांमधून अभिव्यक्त होते तेव्हा तिला अभंग असे म्हणतात. म्हणजे अभंग हे ओवीचे मालात्मक रूप आहे. सुनीत, गझल, आरती हेदेखील काव्यरचना प्रकारच आहेत. पण त्यांचा छंद सुनिश्चित नसतो. वेगवेगळ्या वृत्तात सुनीत लिहिले जाऊ शकते. अभंग मात्र फक्त ओवीबद्धच असतो. तशी प्रथा-परंपरा असल्यामुळे आपण ओवी-अभंग असा शब्दप्रयोग सर्रास करतो. मर्ढेकरांनी ओवी-अभंग छंदातून नवी जाणीव व्यक्त केली असे आपण म्हणतो तेव्हा या दोहोंतील ही वर्गवारी ध्यानात घेणे गरजेचे आहे.

मर्ढेकरांची महायुद्धजन्य आणि महायुद्धोत्तर नवी जाणीव देवीवर व देवद्वार या ओवी-अभंग अक्षरछंदांतून, ग्रांथिक ओवीतून आणि पादाकुलक या जातिरचनेतून प्रामुख्याने प्रकटली आहे. 'शिशिरागमा'तील पारंपारिक पद्धतीची भावकविता लिहिणारे मर्ढेकर वेगळे आहेत. आणि 'काही कविता'तून प्रकटलेले मर्ढेकर वेगळे आहेत. मर्ढेकरांना 'नवकाव्याचे जनक' ही उपाधी मिळाली ती 'काही कविता'तील कवितांपासून. 'काही कविता'च्या प्रास्ताविकातूनच त्यांनी 'माझा अभंग माझी ओवी' म्हणत प्रवेश केला होता. हे दोन्ही छंद अक्षरछंद आहेत. म्हणजे ते अक्षरगणवृत्त आणि जाती व मात्रावृत्ताच्या तुलनेत रचनेला सोपे आहेत. ते जुने म्हणजे परंपरेने शेकडो वर्षांपासून अस्तित्वात असलेले खऱ्या अर्थाचे मराठी अक्षरछंद आहेत. या ओवी-अभंगाच्या धाटणीचा विचार केला तर मराठीभाषक समाजाला तिची एक जुनी सांस्कृतिक ओळख आहे. लिखित आणि मौखिक अशा दोन्ही परंपरांत रुळलेली ओवी आणि अभंगरचना मराठी माणसाला नवी नाही. 'विवेकसिंधू', 'ज्ञानेश्वरी' यांसारखे आध्यात्मिक ग्रंथ, वेगवेगळी आख्यानकाव्ये, महाकाव्ये ओवीबद्ध आहेत. फादर स्टीफनसारखा परभाषक कवीदेखील आपल्या 'ख्रिस्त पुराणा'साठी ओवीचा अवलंब करताना दिसतो. थोडक्यात सांगायचे झाले तर वेगवेगळी शास्त्रे, तत्त्वज्ञानपर ग्रंथ, भाष्यग्रंथ यांचे वहन झालेल्या ओवीचे छंदाचे प्रवाहीपण, रचनेचे सोपेपण आणि कठीण विषयही सहजतेने पेलण्याचे, आविष्कृत करण्याचे तिचे सामर्थ्य कवी या नात्याने मर्ढेकरांनी जाणले. ओवीछंदाच्या मुळातच सैल तरीही लयबद्ध अशा रूपबंधाचाच अधिक सैल आणि प्रवाही असा रचनाबंध म्हणजे ग्रंथिक ओवी. या ग्रंथिक ओवीच्या रूपबंधाने मर्ढेकरांचा नवा व्यामिश्र आशय सहज पेलल्यामुळे त्यांना मुक्तछंदाची तितकीशी गरज भासली नाही. अक्षरगणवृत्त आणि मात्रावृत्तात असणारी नियमबद्धतेची गैरसोय त्यांना या ग्रांथिक ओवीच्या तसेच देवद्वार व देवीवर अभंगाच्या अवलंबनातून सहजपणे टाळता आली.

म्हणूनच जुन्या छंदांच्या अभिव्यक्तीच्या दृष्टीने जाणवणाऱ्या अडचणींचा बाऊ न करता वा नव्या छंदाच्या निर्मितीचा घाट न घालता मर्ढेकरांनी हे जुनेच छंद उपयोजिले आणि त्यांना आपल्या समर्थ प्रतिभेने नवी झळाळी बहाल केली, या छंदांचे पुनरुज्जीवन केले.

ओवी या अक्षरछंदाचे वैशिष्ट्य असे आहे की गणसंख्या, मात्रासंख्या, अक्षरसंख्या, चरणसंख्या या बाबतीत ती शिथिल आहे. तरीही ती श्रुतिसुभग आहे. ओवीची शिथिलता, अक्षरसंख्या, यती, मात्रा यांबाबतची सवलत तिच्या व्याख्येतून स्पष्ट झालेली आहे. शके १५००च्या आसपास होऊन गेलेल्या भीष्माचार्य या महानुभावाने आपल्या 'मार्गप्रभाकर' या ग्रंथात तिचे लक्षण दिले आहे. वि०का० राजवाडे यांनी ते आपल्या 'मराठी छंद' या पुस्तिकेत उद्धृत केले आहे. ते पुढीलप्रमाणे आहे : 'गायत्री छंदापासौनि धृतिपर्यंत, ग्रंथ वोवियाचे तीन चरण जाणावे निश्चित, प्रतिष्ठेपासौनि जगतीपर्यंत, चौथा चरण.' याचा अर्थ या ग्रांथिक ओवीच्या पहिल्या तीन चरणांत सहापासून सोळापर्यंत कितीही अक्षरे असू शकतात, आणि चौथा चरण चारपासून तेरापर्यंत कितीही अक्षरांचा असू शकतो. तरीही तिच्यात गेयता आहे. थोडक्यात रचनेला तर ती अशा प्रकारे सुलभ आहेच पण तिची आविष्कारक्षमता आणि आवाहनक्षमताही वादातीत आहे. शिवाय तिच्यात रचनेच्या दृष्टीने लवचीकता आणि परिवर्तनशीलता असल्याने सर्जनशील कलावंतांना तिचे कायम आकर्षण वाटत आले आहे. आशयाच्या गरजेनुसार आकार धारण करण्याची तिची क्षमताही असाधारण आहे. यमक प्रासाबाबतही ती फार उदार आहे. अशा ओवीला वि०का० राजवाडे यांनी 'छंदसागर' संबोधिले आहे ते योग्यच आहे. वा०ना० देशपांडे (१९३१, पृ०१३१) यांनीदेखील मुक्तछंदास खऱ्या अर्थाने मुक्त करण्याच्या दिशेने केलेला नम्र प्रयत्न म्हणून जी मुक्त ओवी प्रस्तुत केली होती तीदेखील ग्रांथिक ओवीच होती. 'ग्रांथिक ओवी प्राचीन काळचा मुक्तछंदच होय,' असे त्यांचे मत हाते. ओवीची काळानुरूप, स्थळानुरूप, व्यक्तीनुरूप बदलण्याची क्षमता प्रचंड आहे. याशिवाय सर्व प्रकारच्या आशयाचे वहन करण्याचे सामर्थ्य तिच्यात असल्याने ती काळाच्या ओघात टिकून राहिलेली दिसते. सर्वांत महत्त्वाचे म्हणजे ओवी हा आशयाचे तटस्थपणे वहन करणारा साचा नसून आशयाला नवे परिणाम देणारा, वळण देणारा, सौंदर्य बहाल करणारा समर्थ छंद आहे. ओवी-छंदाची ही सगळी गुणवैशिष्ट्ये आणि त्याचे सामर्थ्य यांचा फार चांगला उपयोग मर्ढेकरांनी आपल्या नव्या आशयाच्या नव्या कवितेसाठी करून घेतलेला दिसून येतो.

'माझा अभंग माझी ओवी, नतद्रष्ट गाथा गोवी, इंजिनावीण गाडी जेवी

घरंगळे'... असे म्हणत, लीनता धारण करीत मर्ढेकर ओवी-अभंगांच्या प्रांतात आले. 'कुठे ज्ञानेश्वर श्रेष्ठ, कुठे तुकाराम पवित्र, कुठे समर्थ धीरोदात्त, संत सर्व...' असे म्हणत संतांच्या मोठेपणाला अभिवादन करीत ते प्रवेशले. भक्तिमार्गप्रवणता, तत्त्वबोधक उपदेश यासाठी शतकानुशतके प्रसिद्ध असलेली त्यांची ओवी आपलीशी करू लागले. विशिष्ट संचित चिकटलेल्या, वेगळी प्रतिमा असलेल्या भक्तिमय ओवीत आपला नवा आशय भरू लागले. नवी जाणीव व्यक्त करू लागले. त्यांच्या प्रतिभास्पर्शाने या छंदांत असा काही नवा प्राण ओतला की मर्ढेकरोत्तर काव्याचा हा छंद एक अपरिहार्य घटक होऊन बसला.

'शब्दांवर थोडी हुकमत असली आणि लय तोंडवळणी पडली म्हणजे कविता लिहिणं फारसं कठीण नसतं' असे त्यांनी 'काही कविता'च्या प्रास्ताविकात म्हटले आहे. या तोंडवळणी पडलेल्या लयीतून त्यांचा आशय विनासायास आणि सशक्तपणे प्रकटला आहे. मर्ढेकरांची कविता आशयानुवर्ती असल्यामुळे त्यांनी सर्वांत अधिक महत्त्व आशयाच्या यथोचित प्रकटीकरणाला दिले आहे. छंदांच्या बंधनाचा त्यांनी जाच करून न घेता तुलनेने सोपे छंद उपयोजिले. कधी त्यांची संमिश्र बांधणी केली आणि यमकबांधणीतही वैविध्य आणले. या उपायांनी त्यांनी छंदबदल न करताही पारंपरिक छंदांतून नवा आशय प्रकट केला. 'काही कविता'तील कवितांचा संख्यात्मकदृष्ट्या अभ्यास नोंदवायचा झाला तर या संग्रहातील एकूण साठ कवितांपैकी १) शुभ्रतिमिर (जाती-उद्धव), २) पोपटपंची (बालानंद व यादाकुलक जाती संमिश्र) ३) रखड रखड रखड जरी (परिलीना, जीवनलहरी जाती संमिश्र) ४) काळ्या बंबाळ अंधारी (अक्षरछंद व चंद्रकांत जाती संमिश्र) ५) गोंधळलेल्या अन् चिंचोळ्या (पादाकुलक, परिलीना, दासी जाती संमिश्र) ६) फस्फसून येतो (भूपती जाती) ७) वावडी वाह्यात (अक्षरगणवृत्त देवप्रिया, पांडव) अशा सात कविता व ८) आलो क्षणीचा विसावा ही मुक्तछंदातील कविता वगळता बाकीची नव्या आशयाची बहुतांश कविता ग्रांथिक ओवी, देवद्वार आणि देवीवर अभंग, पादाकुलक अक्षरछंद आणि पादाकुलक जाती यांतून प्रकटलेली आहे.

तसेच 'आणखी काही कविता' या संग्रहातील एकूण पस्तीस कवितांपैकी १) 'भंगू दे काठिण्य माझे' ही व्योमगंगा अक्षरगणवृत्तातील आणि २) 'अभ्ररम्य पद्मिनी' ही जाती सूर्यकांत (समुदितमदना) आणि चंद्रकांत (पतितपावन) अशी संमिश्र रचना वगळली तर ऊर्वरित सगळी कविता देवद्वार, देवीवर या अक्षरछंदांत वा पादाकुलक या जातीत आहे. मात्र ग्रांथिक ओवीचा अवलंब इथे नाही. मुळात या छंदांची रचनादृष्ट्या असणारी सहज-सुगमता आणि कवीच्या अंगवळणी पडलेली

या छंदांची लयसारणी, यांमुळे नवा आशयदेखील या छंदांनी समर्थपणे तोलून धरला, प्रवाहित केला. या छंदांच्या सैल बांधणीमुळे, तसेच गणमात्रा-यति-यमक इ० च्या बंधनविरहिततेमुळे त्यांच्या अभिव्यक्तीला रूढ छंदांचा काच तर झाला नाहीच, उलट ती सुलभरीत्या साधता येऊन नव्या मुक्तछंदाचीही गरज भासली नाही. उदा०

आग अंधाराची जीवा, कोण्या देवाने लावली!
गेल्या जन्मीची पातके, फळा आली.

इथे नियमित ८-८-८-४ अशी अक्षरसंख्या असलेल्या देवीवर अभंगातून आशय जसा स्वाभाविकपणे प्रकटला आहे तसाच तो अनियमित अक्षरसंख्येच्या अधिक सैलसर अशा ग्रांथिक ओवीतूनही प्रकटला आहे. उदा०

अरे हिंदू मुसलमान, प्राण देशावरी कुर्बान;
परी यादवी ही लांछन, अल्ला-रामा;
जो जो उठे तो तो नेता, मारी लंब्याचवड्या बाता;
परि हुल्लडीचा नियंता, कोणी नाही

हा भाव सहजी प्रकटला आहे. त्यांच्या 'मस्तली इच्छेची काया', 'दोन खोल्यांच्या बिऱ्हाडी', 'आहे बुद्धीशी इमान', 'नाही कुणी का कुणाचा!', 'केले जन्मापासूनि रान', 'शिवलिंग माझे लिंग', 'जे अज्ञानात जन्मले', 'फिरता पिसाट पिसाट', यांसारख्या कित्येक कविता या ग्रांथिक ओवी-छंदात आहेत. मुळातच हा छंद प्रवाही, लवचीक तसेच अनुशासित पण एकसुरीपणा नसलेला छंद आहे. इथे प्रतिचरणी अनियमित शब्दसंख्येची सवलत असल्याने त्या-त्या आशयापुरत्या ओळी येऊ शकल्या आहेत. भाव जसाच्या तसा प्रकटण्याच्या दृष्टीने ही सवलत फार मोठे योगदान देणारी आहे आणि मर्ढेकरांच्या कवितेला तिचा लाभ करून घेता आला आहे. ओवीचा आकृतिबंध साडेतीन चरणांचा असल्यामुळे आशयाचे इथे नियमनही झाले आणि त्यात सुटसुटीतपणाही आला.

तीच गोष्ट पादाकुलक जातिरचनेची. प्रतिचरणी दोन पद्मावर्तनांनी बनणारी सोळा मात्रांची ही गोड जाती आहे. जातिरचना असल्यामुळे अक्षरसंख्येची अट नाही. गणांचे बंधन नाही. याचे अष्टमात्रक आवर्तन मराठी जिभेवर रुळलेले असते आणि कानालाही परिचित असतेच. मराठीतील 'तुतारी', 'दसरा', 'फुलराणी', 'सुधारक' यांसारख्या बहुसंख्य लोकप्रिय कविता याच जातिरचनेच्या आधाराने प्रकटल्या आहेत. मर्ढेकरांनी ही जाती फार समर्थपणे उपयोजिलेली आहे. त्यांच्या - 'पिपात मेले ओल्या उंदिर', 'काळ मारुनी गेला टपली', 'त्रुटित जीवनी',

'बाळगुनी हा पोटी इवला', 'फलाटदादा फलाटदादा', 'देवळातल्या ऊद हुंगतो', 'विशाल पट्टे सतेज', 'देवाजीने करुणा केली', 'दण्कट दंड स्नायू', 'अशीच होती नकटी', 'हाडांचे सापळे', 'पंक्चरली जरि' या 'काही कविता'तील कविता तसेच 'बन बांबूचे', 'अभ्रांच्या ये', 'कुणि मरावे', 'अस्थाईवर स्थायिक', 'फुटेल (होती वेडी आशा)', 'या गंगेमधि', 'गणपत वाणी', 'खप्पड बसली', 'इरेस पडलो', 'मी एक मुंगी', 'जशि धोब्याची', 'सांदीला पण', 'ह्या दुःखाच्या कढईची', 'दंवात आलीस', 'भटकत फिरलो', 'रहा तिथे तू', 'घडल्या गोष्टी', 'अजून येतो वास फुलांना' यांसारख्या 'आणखी काही कविता'तील कविता पादाकुलक जातिरचनेच्या अष्टमात्रक आवर्तनांतून प्रकटल्या आहेत.

याबाबत एक महत्त्वाचा मुद्दा लक्षात घेणे गरजेचे आहे. प्रसिद्ध विचारवंत कै० कुंदरजी दिवाण (१९९१) यांनी म्हटल्याप्रमाणे प्रगृह्यता हे वृत्तभेदाचे मूळ आहे. कवी विशिष्ट कालभार ठरवितो व तोच पुढे संपूर्ण काव्यात पुनरावृत्त होतो. असे असेल तर मर्ढेकरांची बरीच कविता पद्मावर्तनी वळणाच्या पादाकुलकातून प्रकटली याचे स्पष्टीकरण आपल्याला आपोआप मिळून जाते.

मर्ढेकरांनी संमिश्र जातिरचनाही वापरलेली आहे. कवी एखाद्या छंदाची योजना करतो याचा अर्थ तो विशिष्ट मात्रासंख्या असणारे चरण योजतो. अशा छंदाचे नादावर्तनही विशिष्ट असते - त्याची लय विशिष्ट असते. संपूर्ण कवितेला या लयबद्धतेचा एकसंध आकार त्यामुळे आपोआपच प्राप्त होतो. मात्र संमिश्र जातिरचनेत दोन प्रकारची मात्रावर्तने एकत्र आलेली असतात. अशा प्रकारची संमिश्र जातिरचना परंपरेने आपल्याकडे चालत आलेली आहे. मर्ढेकरांनी या सोयीचा देखील आपल्या आशयासाठी चांगला उपयोग करून घेतलेला दिसून येतो. मुक्तछंदामध्ये जसे त्या-त्या आशयापुरत्या त्या-त्या ओळी वापरण्याची मुभा असते तसाच काहीसा लाभ दोन छंदांना एकत्र आणण्यातून मिळविता येतो. जो आशय ज्या मात्रावलीत बसेल त्या मात्रावलीची उपयोजना करीत त्यांनी आशय प्रवाहित केला आहे. त्यातही विशेष म्हणजे या छंदांचा आपापल्या परीने बंदिस्त असणारा घाट, मात्रांचे कोष्टक, यती, छंदोलय सांभाळत हे संमिश्रण झालेले आहे. संपूर्ण कवितेसाठी एकच जाती वापरण्याऐवजी दोन निरनिराळ्या जातिरचना एकत्र येऊन कविता बांधली गेली आहे अशा कविता पुढीलप्रमाणे आहेत :

१) पोपटपंची ... इथे 'पोपटपंची चतुर्कि जान्... पढो पार्वती शिरि भगवान्...' या दोन ओळी तेवढ्या बालानंद (अचलगती) या जातीत असून बाकी कविता पादाकुलक जातीत आहे. पादाकुलकाच्या ओळी नेहमीसारख्या चार चरणी आहेत तर बालानंद फक्त दोन चरणी आहे. या दोन ओळींचा उपयोग

पार्श्वभूमीसारखा केलेला आहे. शिवाय त्या एखाद्या ध्रुवपदासारख्या पुनःपुन्हा येतात शिवाय त्या तिरप्या ठशात आहेत. कवितेतील मूळ आशयाशी सरळ संबंध नसलेल्या पण विरोध-लय साधत विसंगती दाखवून देणाऱ्या या ओळी आहेत. मूळ कवितेतील आशयापासूनचे त्यांचे वेगळेपण दाखविण्यासाठी कवीने ही साधी सोय आपल्यापुरती करून घेतली आहे. एकाच कवितेसाठी अशा प्रकारच्या दोन छंदांचा वापर करण्यातून त्यांनी आशयातील वेगळेपणा तर राखलाच पण त्याचबरोबर विरोधी ताण पेलण्याची कवितेची ताकदही यामुळे वाढली. २) 'रखड रखड रखड जरी...'मध्ये ध्रुवपद परिलीना या जातीत आहे तर कडवी जीवनलहरी जातीत आहेत. ३) 'काळ्या बंबाळ अंधारी...'मध्ये तर जातिरचना व अक्षरछंद अशी संमिश्र घडण आहे. इथे काही ओळी चंद्रकांत जातीत तर काही ओळी अनुष्टुभ या अक्षरछंदात आहेत.

काळ्या बंबाळ अंधारी
धपापतें हें इंजिन;
कुट्ट पिवळ्या पहाटी
आरवतो दैनंदिन
भोंगा -

अशी अष्टाक्षरी रचना असताना भोंगा हा चरण द्विक्षरी आलेला आहे. इथे अष्टाक्षरी लय दोन अक्षरांनी खेचून घेतली गेली आहे. उरलेले षण्मात्रक आवर्तन अध्याहृत राखले गेले आहे. सांगायचे तेवढेच आणि तसेच सांगून झाल्यावर मर्ढेकर चरणपूर्तीचा अट्टाहास करीत नाहीत. हवा तेवढा आशय हव्या तेवढ्या मात्रिक अवकाशात बसवून पुढे जातात. पुढे लगेचच 'घनःश्याम सुंदरा श्रीधरा गिरणोदय झाला', ही सर्वपरिचित अशी चरणावली किंचितसा शब्दबदल करीत पुन्हा तिच्या पूर्वीच्याच लयीत अवतरली आहे. कवितेच्या मूळ अष्टाक्षरी वळणात ती बसणारी नाहीच, म्हणूनच ती तिरप्या ठशात आलेली आहे. संज्ञाप्रवाही वळणाच्या ओळी अशा प्रकारे लयबदल करीत त्यांच्या अनेक कवितांमध्ये अवतरलेल्या आहेत. म्हणजे जे सांगायचे ते ज्या छंदोलयीत बसते ती छंदोलय त्यांनी सहजपणे उपयोजिली आहे. कवितेच्या एकसंध लयीला त्यामुळे धक्का बसतो खरा, पण आशयाची यथार्थता त्यांना अधिक महत्त्वाची वाटते हेच खरे! अशा उपायांनी मुक्तछंद न वापरता मुक्तछंदाचे सगळे फायदे ते रूढ छंदातूनच मिळवताना दिसतात. ४) 'गोंधळलेल्या अन् चिंचोळ्या...'मध्येही असाच प्रकार आहे. इथे पादाकुलक, परिलीना, दासी अशी तीन जातींची संमिश्र रचना आहे. आशयाचे यथार्थपण आणि प्रवाहीपण त्यांनी कसे नीट सांभाळले आहे. मर्ढेकरांची कविता आशयलक्ष्यी आहे असे म्हटले

जाते ते अशा कवितांचा छंद:शास्त्रीय अभ्यास करताना विशेषत्वाने जाणवते. ५) ''आणखी काही कविता'' या संग्रहातील ...'अभ्ररम्य पद्मिनी' ही कविता सूर्यकांत (समुदितमदना) आणि चंद्रकांत (पतितपावन) जाती यांचे मिश्रण आहे.

आशयाला गोळीबंदपणा प्राप्त करून देण्यात यमकाचे असलेले महत्त्व मर्ढेकरांनी चांगले जाणले होते. त्यामुळेच स्वतंत्रपणे विचार करावा इतक्या विविध प्रकारांनी यमकरचना त्यांनी केली आहे. अंत्य, उपांत्य, अर्धयमके असे प्रकार त्यात आहेत. त्यांच्या योगाने भाषासौष्ठव, नादगौरव, अर्थगांभीर्य आणि अर्थसंघटन यांचा लाभ त्यांच्या कवितेला झाला आहे.

कुठे ज्ञानेश्वर श्रेष्ठ / कुठे तुकाराम पवित्र,
कुठे समर्थ धीरोदात्त / संत सर्व

अशी उपांत्य अक्षरावर जोर देणारी पारंपरिकतेपेक्षा निराळीच यमकरचना इथे आलेली आहे. यमकबांधणी करतानादेखील १) कधी अक्षरसंख्या कायम व यमकबांधणी वेगवेगळी, २) कधी अक्षरसंख्या वेगवेगळी व यमकबांधणी नियमित, ३) कधी दोन्हींत नियमितता तर कधी ४) दोहोंतही अनियमितता असे सगळे वैविध्य आलेले आहे. मुख्य म्हणजे हे आशयाच्या निकडीतून झालेले आहे. निव्वळ बदलासाठी वा प्रयोगासाठी झालेले नाही. खरे तर त्यांनी कोणत्या कवितेत कशा प्रकारची यमकरचना केली आहे, इ० बघणे म्हणजे निव्वळ तांत्रिक खानेसुमारी झाली. त्यांच्या कवितेचे छंदोविषयक अवलोकन करताना ते गरजेचेही आहे. मात्र त्यापलीकडे जाऊन त्यांच्या यमकबद्ध वा निर्यमक बांधणीने त्यांच्या आशयाला कसा न्याय दिला, तिचे अर्थानुवर्तित्व कसे सांभाळले आहे, ते बघणे अधिक सयुक्तिक होईल. तसेच आशयाला न्याय देता यावा म्हणून ते रूढ यमकनियमांना कसे प्रसंगी जवळ करतात वा बाजूला ठेवतात, ते बघणे रसास्वादाला धरून होईल.

त्यांनी शिथिल रचनाही केलेली आहे. त्यांच्या असंग्रहित कवितांपैकी 'एवढ्याशा तळ्यात' या कवितेमध्ये अचलगती (बालानंद) या अक्षरछंदातील सैल रचना आली आहे. या अक्षरछंदात सप्ताक्षरी रचना अपेक्षित असते. म्हणजे प्रतिचरणी सात अक्षरे अपेक्षित असतात. इथे मात्र ही आवर्तनमयता यदृच्छया सांभाळली गेली आहे. उदा०

एवढ्याशा तळ्यात बदकं चार;
पलिकडला काठ अन् हिरवागार;
फुलतात फुलं वासंतिक
झुलतात पाखरं (प्रासंगिक)

अशी नेहमीच्या गद्योचारांना जवळची अशी ही रचना आहे. मर्ढेकरांची ही छंदोलयीबाबतची प्रयोगशीलताच. मुक्तछंद लिहिण्याचेही या बच्चमर्जींनी मनात आणले आहे. अपवादात्मक का होईना पण ''काही कवितां''तील 'आलों क्षणिंचा विसावा' ही कविता मुक्तछंदात आहे.

आलो क्षणिचा विसावा म्हणून;
टेकले पाय;
तों तूंच हटकलेस 'कोण?' म्हणून
आणि मनातले शिणलेले हेतू
शेण झाले.

इथे पहिल्या दोन ओळींतील अष्टमात्रिक आवर्तन स्पष्ट आहे. मात्र त्यापुढील तीनही ओळी सरळ गद्यात आहेत. त्यात कोणत्याही प्रकारची आवर्तनमयता आढळून येत नाही. तसेच त्यांची उच्चारसरणीही अनाघात नसून गद्यातील साघात आहे. आरोहावरोहात्मक म्हणणी अवलंबली तर काही लय हाती लागते आणि ती लय मुक्तछंदाची आहे.

मर्ढेकरांसारख्या कवीचेच नव्हे तर कोणत्याही कवीच्या आशयाचे त्याने योजिलेल्या छंदांशी असलेले नाते उलगडण्याचा असा प्रयत्न करणे म्हणजे गोधडी उसविण्यासारखे असते. निरनिराळ्या आकाराच्या, प्रकारच्या, पोताच्या, तुकड्यांना एका सूत्रात गुंफले असता जसा गोधडीचा विशिष्ट आकृतिबंध प्राप्त होतो तसेच छंदांचे असते. मुळात कविता म्हणजे भाषाव्यापार, काव्यव्यापार, मानसव्यापार असतो. यात सामावलेल्या तर्क, संवेदना, इच्छा, कल्पना, साहचर्ये या सगळ्यांनी मिळून ही गोधडी बनते. लयीच्या माध्यमातून त्यांची गुंफण होऊन तिचा आकार सुनिश्चित होतो. लयीविना तिच्या घटकांचे अस्तित्व सुटे, अलग असते. लयीच्या आधाराने ते परस्परात विलीन होतात, नवा रूपबंध धारण करतात. लयीच्या रसायनात विरघळल्याविना हे शक्य नसते. नवे चैतन्य, नवे रूप धारण करणाऱ्या आशयाला लाभणारे असे छंदरूप अंगभूत असते. आशयाचे ते अविभाज्य अंग असते. कवितेची छंदःशास्त्रीय समीक्षा करताना तिच्या लयीचा विचार करणे यासाठी अगत्याचे असते.

**संदर्भ -**

अनिल (आ०रा० देशपांडे). (शके १८५३). 'मुक्तछंद', 'वागीश्वरी', वर्ष ३. विलास १-२, नागपूर

दिवाण, कुंदरजी. १९९१. 'छंदःशास्त्र : एक अध्ययन'. विदर्भ साहित्य संघ प्रकाशन, नागपूर.

देशपांडे, वा०ना० १९६१, 'मुक्तओवी : मराठीचा खरा मुक्तछंद', 'विमर्शिनी'. व्हीनस प्रकाशन, पुणे.

पातुरकर, शुभांगी. २००८. 'छंद:शास्त्रीय समीक्षा'. दिलीपराज प्रकाशन, पुणे.

■

11/बी, 21, शासकीय अधिकारी वसाहत,
हाजी अली, मुंबई 400 934
चलभाष : 098703 11534

## अस्मिता

आम्हाला युरोपात काय चालले आहे याची बातमी असते. हे काही वाईट नाही, उलट चांगलेच आहे. पण शेजारच्या भाषांत काय चालले आहे हे माहीत नसते. ही खेदाची गोष्ट आहे. अस्मिता जरूर असावी पण ती ज्ञानावर आधारित असावी. संग्राहक वृत्तीबरोबर, जिज्ञासूपणाबरोबर आणि इतर भाषिक संस्कृतींच्या परस्पर आदराबरोबर जी अस्मिता निगडित असते ती खरी अस्मिता. बाकी निव्वळ स्वार्थी, गल्लाभारू राजकारण.

अरुण खोपकर
प्रस्तावना, 'वाचणाऱ्याची रोजनिशी'

## दाताला घामोळ्या

कोरडी सहानुभूती दाखविणाऱ्या माणसाला ग्रामीण स्त्री फटकळपणे सुनावते, 'फुकटची मया अन् दाताले घामोया.' कोणत्याही प्रकारची झीज न सोसता केवळ शाब्दिक ममता म्हणजे निरर्थक. दाताला घामोळ्या येणे जसे दुरापास्त तसे फुकटच्या कोरड्या शब्दांनी कुणाला दिलासा मिळणेही अशक्यच. असतो तो एक कोरडा उपचार. नाटकी आचार.

- डॉ० मधुकर वाकोडे
'आपले वाङ्मयवृत्त', ऑगस्ट २०१०, पृष्ठ ५



अनुक्रमणिका

# 'की' नी 'ग'

शरदिनी मोहिते

लहान मुलांच्या बोलण्याचा, कधीकधी, कितीही प्रयत्न केला तरी उलगडा होत नाही, त्यांनी न कळता निर्माण केलेले आणि नंतरही कितीतरी काळ वापरात ठेवलेले असे काही शब्द असतात, की ते का आणि कसे निर्माण झाले असतील... त्या-त्या बाळाला तो-तो शब्द का बोलावा वाटला असेल.... काही उमज पडत नाही. त्या बाळानं त्या वेळी वापरलेले शब्द - त्यात वापरले गेलेले वर्ण-स्वर आणि व्यंजनं यांचे क्रम आणि ज्या अर्थांसाठी ते वापरले गेले त्यांचा, त्याच्याशी असलेला, खरं म्हणजे नसलेला संबंध या गोष्टींचा काही धागादोरा लागायला म्हणून तयार होत नाही...

आमचा मिनू जेसीबी यंत्रांना **की** म्हणतो. घराजवळच असलेल्या नदीच्या पात्रातला गाळ काढत असलेली ही यंत्रं त्याला रोज दिसतात. की म्हणजे काय हे आम्हांला समजेनाच हे पाहून थक्क होत मिनूनंच त्या यंत्राकडे बोट दाखवून आम्हाला समजावून सांगितलं 'की!'... म्हणजे या गोष्टीला की म्हणतात बरं का! किंवा की म्हणजे ही गोष्ट! कळलं का?... गडद पिवळ्या रंगाच्या त्या यंत्राचं मिनूला विलक्षण आकर्षण. त्याच्या खेळण्यांमधेही कितीतरी लहानमोठी 'की' आहेत. काही भक्कम चांगली टिकणारी तर काही नुसतीच देखणी. किंचित निमित्त होताच मोडून जाणारी, नाजूक. मिनूला घेऊन चित्रं काढायला लागलं की तो सांगतो 'की' काढ. 'की'चं चित्र काढलं की मग म्हणतो, ''तो 'की' काम का करत नाही?'' मग त्याला सांगायचं की ''त्याचा ड्रायव्हर जेवायला गेलाय...''

''पण 'की' चा हात तरी खाली वाकलेला काढ ना.''

मग 'की' चा हात खाली वाकलेला काढायचा. मग हा म्हणणार, ''नुसता हात वाकवून काय करतोय तो?''

तर मग आपण चित्रातल्या हाताशेजारी एक मातीचा ढीग काढायचा. म्हणायचं, ''त्यानं बघ किती माती उचलून ठेवलीये... आता तो जरा दमलाय'', 'की'च्या या चित्राबद्दलच्या शंका विचारून, रसग्रहण करून झालं की हा म्हणणार - '' 'की'चा भाऊ काढ आता!''





अनुक्रमणिका

मग आणखी एक 'की' काढायचा. त्याच्या म्हणण्याप्रमाणे या पहिल्या 'की'चा लहान किंवा मोठा भाऊ... असा हा खेळ रंगतो. एका यंत्रासारखं दुसरं यंत्र म्हणजे एकाचा दुसरा भाऊ ही कल्पनाच किती सुरेख आहे !

तरी मनात येतं हा मिनू या यंत्राला 'की' का म्हणतोय? त्याला विचारावं तर त्याला तर त्याबद्दल काही सांगता येत नाहीच, आम्हांलाही समजत नाही 'की' या शब्दाचं मूळ काय असावं ते. मग तो म्हणतो ना 'की', म्हणू दे.

चांगलं कळून समजून बोलायला येण्याआधी बाळं आपल्या ऐकण्यात आलेले शब्द वापरून पाहण्याचे पराक्रम करत असतात. वापरले जाणारे शब्द आणि त्यांच्या अर्थांचा संदर्भ यांच्या मेळाच्या बाबतीत त्यांच्या ठायी तसा 'उजेड'च असतो. नुकताच प्ले-ग्रुपला जायला लागलेला मिलिंद हा सोहनींचा अगदी गोड मुलगा. बऱ्यापैकी बोलत असलेला. आपल्या भागात लाडाची एक गमतीची अजब पद्धत आढळते. मुलाला मुलीसारखं बोलवायचं. मुलीला मुलासारखं बोलवायचं. मिलिंदला एकदा त्याच्या आजीनं विचारलं, ''तू कोण गं?''

तर तो म्हणाला, ''फुआची आती!'' आता फुआ म्हणजे काय? आती म्हणजे काय? तो फुआची आती म्हणत होता, म्हणजे त्याला निश्चितच काहीतरी म्हणायचं होतं. पण तो कोणाला समजेल अशा शब्दात मांडू शकत नव्हता.

विठ्ठल हरीबा सावंत या आमच्या सख्ख्या मामेभावाला माझ्या ताईनं आणि तिच्यामुळे मीही कायम 'भा' म्हणूनच ओळखलं. आमची इतकी वयं झाली तरी, त्याचं वय झालं, तो गेला तरीही! का? त्याचं समाधानकारक उत्तर मिळत नाही. कदाचित कोण्या नातलगांनी त्याला आम्ही भाऊजी म्हणावं म्हणून प्रयत्न केला असावा आणि आम्ही त्याचं संक्षिप्त रूप पकडून बसलो असू... माहीत नाही. पण तो 'भा' झाला आणि त्याचा धाकटा भाऊही रामचंद्र 'रामभा' झाला! आम्ही दोघींनी निर्माण केलेलं 'भा' हे नाव फारशी कुरकुर न करता स्वीकारलं गेलं, त्याचं भाबड्या प्रेमानं कौतुकही केलं गेलं! जेव्हा आम्हांला विठ्ठल हरीबा सावंतांचं पत्र यायचं तेव्हा सही न चुकता 'भा'अशीच असायची. (इतरांच्या पत्रात तो विठ्ठलच असायचा.) आता त्याच्या संपूर्ण नावात आणि 'भा' मधे कानाकाडीचा तरी संबंध आहे का? पण ते नाव पडलं हे मात्र खरं...

मला माझ्या भाचीनं तिला मला मावशी न म्हणता आल्याने असो किंवा तसं म्हणणं तिला रुचलं नसल्यामुळे असो, किंवा तिची स्वत:ची इच्छा म्हणून असो, 'आकोम' म्हटलं... आता ती नाही, परंतु तिनं मला बहाल केलेलं ते नाव अजून प्रचलित आहे. माझे भाचे, त्यांच्या बायका, त्यांची मुलं मला नेहमी 'आकोम'

म्हणूनच हाक मारतात आणि तसा उल्लेखही करतात... एक मावशी आकोम झाली, तर आमच्या नात्यातली दुसरी एक मावशी झाली 'चोई'! तिच्या नावात मावशी या शब्दातील या शब्दाचा एकही अक्षराचा संबंध नाही, पण चोई हे नाव पडलं एवढं खरं आणि नंतरही ते चालूच राहिलं हेही खरं...

नुकतीच बोलायला शिकलेली आमची ईशा चहाला फा म्हणून लागली. चहा या शब्दात आणि फा मध्येही 'ह'कार आहे. Chaha आणि Pha. किंचित साम्य. तरी 'फा' म्हटल्यावर 'चहा' कोणाला तरी कळेल का? कहर गोंधळात टाकणारी गोष्ट म्हणजे ती त्या वेळी चमच्याला 'पे पे' म्हणत होती. कशाचा तरी कुठेतरी संबंध आहे का? त्या वेळी मी डायरीत हे लिहून ठेवलं तेव्हाही म्हटलं होतं - का? असं का म्हटलं जावं? कोणी काही चुकीचं बोलायला शिकवत नाही. मग असं का आणि कसं बोललं जातं? कोण काही उत्तर देऊ शकेल?

छोट्यांशी बोलताना आपल्यालाच कोडी पडतात असं नाही, आपण बोलतो ते मोठ्यांना कळतच कसं नाही म्हणून मुलांचाही वैताग-वैताग होऊन जातो! का यांना समजत नाही, कसं यांना समजावयाचं अशा प्रयत्नात ती कसूर मात्र करत नाहीत. आमचा साहील एकदा सर्वांना काहीतरी सांगत होता, पुन:पुन्हा सांगत होता. पण कोणालाच काही कळत नव्हतं... आणि आम्हांला ते काही समजत नाही हे पाहून तो हताश होत होता आणि तरीदेखील पुन:पुन्हा सांगण्याचा त्याचा प्रयत्न चालूच होता. आपल्या वाढदिवसानिमित्त त्याला अमुक एका प्रकारचा शर्ट हवा होता. तो 'लॉकर-लॉकर' म्हणत आम्हांला समजावू पाहत होता. परंतु लॉकर हा काय प्रकार आहे याचा आम्हांला बोध होत नव्हता. शेवटी त्यानं हावभाव सुरू केले तेव्हा कुठे आम्हांला समजलं की याला कॉलरवाला शर्ट हवा आहे. वर्णांचा व्यत्यास झाल्यामुळे असा गोंधळ होऊन गेला होता!

एक गमतीची गोष्ट - माझी भाचरं अगदी छोटी असताना विद्युत-रोषणाईला म्हणायला लागली 'ग'. आम्हीही म्हणू लागलो 'ग'! आणि आमच्या मुलांच्या मुलांना - नातवंडांना कधी रोषणाई दाखवली, तर त्यांना आम्ही तिची ओळख करून देतो - 'ग' म्हणूनच! इतकी सवय पडून गेली 'ग'ची आम्हांला, त्या छोट्या बाळानं रोषणाईचं देखणं रूप पाहून, म्हटलं असावं 'अगं ग' ऐवजी 'ग'. पण ते आमच्याही मनानं पत्करलं आणि त्यानं आमच्या बोलीत मानाचं गौरवशाली स्थान पक्क करून टाकलं !

■

स्थिरभाष : (020) 2425 1353, चलभाष : 099216 08242

# शुभानन गांगलांचे अवघड प्रकरण

नितीन निमकर, स्वप्निल हजारे

गेली दोन-तीन वर्षे शुभानन गांगल यांनी 'शुद्धलेखनाचे शून्य नियम' व 'गांगल फाँट' या त्यांच्या दोन 'पेटंट' विचारांनी भाषाविज्ञान व संगणक क्षेत्रातील अनुभवी तज्ज्ञांना उबग आणला आहे. यापूर्वी त्यांच्या 'शुद्धलेखनाचे शून्य नियम' या पुस्तिकेतील विचारांना ज्येष्ठ भाषावैज्ञानिक प्रा० मिलिंद मालशे यांनी अभ्यासकीय प्रतिवादाने उघडे पाडले होते. असेच 'अतिक्रमण' शुभानन गांगल यांनी 'संगणक व मराठी' या विषयाच्या बाबतीतही गेले काही वर्षे सुरू केले आहे. 'सोप्पी मराठी'च्या नावाखाली संगणकावर मराठीसाठी जे अवघड व न पचणारे विचार ते मांडत आहेत ते व्यक्तिशः तपासूनच हा प्रतिवाद केला आहे. शुभानन गांगलांमुळे मराठी युनिकोडच्या महाराष्ट्रातील वाढत्या प्रसाराला बाधा पोचत असल्याने व लोकांची विनाकारण दिशाभूल होत असल्याने हे करणे आम्हाला भाग पडत आहे.

'सोप्पी मराठी' या आपल्या उत्पादनाचे 'मार्केटिंग' करताना शुभानन गांगल आपला 'युनिकोड गांगल टंक' आणि 'फोनेटिक कीबोर्ड ड्रायव्हर' देतात. काही महिन्यांपूर्वीपर्यंत याच गांगलांना जगाने मान्य केलेल्या युनिकोडचे वावडे होते. काही वर्षांपूर्वी त्यांनी जेव्हा पहिल्यांदा 'गांगल टंक' बनवला तेव्हा तो युनिकोड प्रमाणित नव्हता. तेव्हादेखील 'गांगल फाँट' हा युनिकोडपेक्षाही सरस आहे व 'युनिकोडमुळे मराठीचे वाटोळे होणार आहे' या त्यांच्या विधानांचा अर्थ संगणक तज्ज्ञांना कधीच कळला नव्हता (असेच काहीसे प्रा० मालशे यांचे शुद्धलेखनाच्या बाबतीत झाले असावे.)

शुभानन गांगल यांनी २८ मे २००८ रोजी गुगल लॅबला त्यांच्या गांगल टंक वापरण्याचे केलेले आवाहन वाचनात आले. त्याला उत्तर देताना केदार पाटील या गुगलसंबंधित व्यक्तीने ''तुमचा फाँट तपासला असता तुम्ही युनिकोड मानक वापरत नसल्यामुळे तो गुगलला वापरता येण्याजोगा नाही. तो वापरला तर आपण पुन्हा मागच्या काळात जाऊन मागासलेले राहू'' असे सांगितले आहे.

(संदर्भ : http://groups.google.com/group/google-indialabs/browsethread/thread/fcef24b18c4a5866)

खुद्द गुगलसारख्या महाजालावर वर्चस्व असणाऱ्या कंपनीने युनिकोडचा आग्रह धरला तरी देखील गांगल यांनी आपला 'गांगल फाँट' युनिकोडमध्ये आणला नव्हता. नुकत्याच झालेल्या पुणे येथील साहित्य संमेलनात मराठी अभ्यास केंद्राने 'युनिकोड व संगणकावर मराठीचा वापर' ही पुस्तिका व त्यावर सादरीकरण ठेवले होते. त्यावेळेस वाद घालताना शुभानन गांगल यांनी 'युनिकोडला तुम्ही सर्वश्रेष्ठ का मानता' असे विचारून वर 'माझे अभिनव संशोधन कळायला तुम्हाला वेळ लागेल' अशी पुस्तीही जोडली होती!

अशा प्रकारे इतकी वर्षे युनिकोडला नावे ठेवणाऱ्या शुभानन गांगलांनी आता एकदम युनिकोडची जपमाळ ओढायला सुरुवात केली आहे. ध्यानीमनी नसताना अचानक एके दिवशी त्यांच्या 'गांगल फाँट'चे 'गांगल युनिकोड फाँट' असे बारसे झालेले पाहण्यात आले. युनिकोडमध्ये नसलेल्या कोणत्याही फाँटला शासनाने मंत्रालयाचे दरवाजे बंद केल्यामुळे त्यांना नैराश्य आले, की युनिकोडला पर्याय नाही हे सत्य त्यांनी मान्य केले हे कळायला मार्ग नाही.

हरतऱ्हेने युनिकोडची हेटाळणी करून अपयश आल्यावर शुभानन गांगल आता साळसूदपणे मराठी युनिकोड टंक लोकांना 'मोबदला' घेऊन देत आहेत. संगणकावर मराठी वापरण्यासाठी ते जी 'सोप्पी मराठी' देतात, ते म्हणजे दुसरे काहीही नसून त्यांच्या आधीच्याच गांगल फाँटची युनिकोड आवृत्ती आहे. पण त्यांच्या माहिती पुस्तिकेत मात्र ते 'मराठी युनिकोड' टंक नाही, ते टूल आहे' असे सांगतात. ह्या टंकासाठी ते १०० रुपयांची मागणी करतात आणि 'विकत घेतले' तरच आपले टूल तुम्हाला मराठी युनिकोड वापरायला देईल असे सांगतात. यासोबत टायपिंगच्या दोन पद्धती मिळतील असेही ते लिहितात. या दोन पद्धती म्हणजे इन्स्क्रिप्ट कळफलक किंवा आपला स्वत:चा फोनेटिक कळफलक. इन्स्क्रिप्ट कळफलक संगणकातच बाय डिफॉल्ट बसवलेला असतो. फोनेटिकची सोय तर बरहा, गुगलचे ट्रान्स्लिटरेशन टूल, मायक्रोसॉफ्टचे आयएमई यांनी मोफतच दिली आहे. मायक्रोसॉफ्टकडून मिळणारे सहा-सात युनिकोड टंक आणि सीडॅकने दिलेले अनेक युनिकोड टंक मोफत उपलब्ध असताना सामान्य दिसणाऱ्या गांगल फाँटसाठी एक रुपयाही मोजणे म्हणजे खरेतर पैशाचा अपव्यय आहे. हे म्हणजे परसदारात ताजा भाजीपाला उगवत असतानाही पायपीट करून शिळी भाजी विकत आणण्यासारखे झाले. वास्तव असे आहे की शासकीय अनास्थेमुळे व विषयाचे गांभीर्य नसल्यामुळे अधिकृत मराठी वर्णमालेशी सुसंगत असे आकर्षक युनिकोड टंक संख्येने तसे मर्यादित आहेत. ते देखील मायक्रोसॉफ्ट, महाजाल व सी-डॅक अशांमध्ये विखुरले गेले आहेत. त्यातील टंकांमध्ये लहान-सहान दोष असतीलही,

मात्र आजच्या घडीला ते मराठीची संगणकावरील टंकलेखनाची गरज यथास्थित भागवत आहेत. सर्वात महत्त्वाचे म्हणजे हे सर्व टंक विनामूल्य आहेत. तरीदेखील परिपूर्ण व आकर्षक युनिकोड टंक तयार करण्यासाठी कोणी तज्ज्ञाने पुढाकार घेतला तर त्याचे स्वागतच होईल. गांगलांचा टंक त्या दृष्टीने चांगला असता तरी गोष्ट वेगळी होता. मात्र मुळात वळण व आकर्षकतेच्या दृष्टिकोनातून गांगलांचा सध्याचा युनिकोड टंक अतिसामान्य आहे. खरेतर नाममात्र त्रुटी असलेल्या युनिकोड टंकांकडे बोट दाखवूनच इतकी वर्षं गांगल त्यांच्या अयुनिकोड फाँटची 'शास्त्रशुद्धता' लोकांना दाखवून देत होते. आता त्यालाच युनिकोड टंकाचे आवरण चढवल्यावर 'जसे ओठांनी लिहावे... तसे कागदावरच्या शाईला बोलता यावे... जिभेच्या टोकावर असलेल्या मराठीने ... संगणकात बोटांच्या टोकातून झिरपावे' असे अर्थहीन काव्य रचून ते स्वानंद घेताहेत.

**'सोप्पी मराठी'सोबत शुभानन गांगल देत असलेल्या माहिती पुस्तिकांबद्दल**

१. "How to set up Unicode Devanagari in the System" या माहिती पुस्तिकेत गांगलांनी 'युनिकोड हिंदी चालू करा' असे म्हटलेले आहे. 'येथे दिसणारे HI म्हणजे मराठी नव्हे तर 'सोप्पी मराठी'तून मिळणाऱ्या निळ्या 'अ' मधून युनिकोड मराठी काम करते. तुम्ही पैसे दिल्यावर हा निळा 'अ' चालू होईल' अशी माहिती ते देतात.

आता हे मात्र संतापजनक आहे. मराठी युनिकोडचा पर्याय असतानादेखील 'हिंदी चालू करा' असे सांगून त्याच्यामार्फत 'सोप्पी मराठी' हे आपले सॉफ्टवेअर गळी उतरवण्याचा गांगलांचा प्रयत्न चीड आणणारा आहे. जर युनिकोडची निर्मिती करणाऱ्यांना हिंदी म्हणजेच मराठी असे अभिप्रेत असते तर त्यांनी मराठीचा वेगळा पर्याय दिलाच नसता. त्याचबरोबर ऑपरेटिंग सिस्टिम तयार करणाऱ्या जगातील प्रमुख संगणक कंपन्यांनी (उदा० मायक्रोसॉफ्ट, रेड हॅट इ०) युनिकोड देताना हिंदी आणि मराठी असे दोन वेगळे पर्याय देवनागरी लिपी वापरण्यासाठी दिलेले आहेत. सर्वसामान्यांना हे माहिती नसल्याने मराठी युनिकोडचा संगणकातील पर्याय दडवून ठेऊन 'सोप्पी मराठी' पुढे रेटणे गांगलांना शक्य झाले आहे. हिंदीच्या तव्यावर आपल्या मराठी सॉफ्टवेअरची पोळी भाजण्याचा त्यांचा हा डाव निषेधार्ह आहे.

२. 'Soppi Marathi User Guide' या फाईलमध्ये ते मराठी युनिकोड हे त्यांचे टूल आहे असे बिनदिक्कत म्हणतात. खरं पाहाता ते मराठी युनिकोड मानक मानणारे एक टंकन टूल (कीबोर्ड ड्रायव्हर) आहे. त्यानंतर ते मराठी युनिकोडचे फायदे सांगतात. (ते दोन-तीन वर्षांपूर्वी त्यांनाच मान्य नव्हते हा भाग वेगळा) हे

फायदे सांगतानाही मराठी युनिकोड जणू त्यांचेच उत्पादन आहे अशी मांडणी ते करतात व सर्वप्रकारच्या ऑपरेटिंग सिस्टममध्ये मराठी युनिकोड येतेच हे लपवतात; या खोटारडेपणाला काय म्हणावे?

३. फोनेटिक कीबोर्डबद्दल गांगलांना विशेष ममत्व असल्यामुळे केंद्रशासनमान्य व सर्व संगणकांवर बाय डिफॉल्ट असलेल्या इन्स्क्रिप्टच्या कीबोर्डबद्दल ते मुद्दामहून फारशी माहिती देत नाहीत. इन्स्क्रिप्टचा कळफलक हा मायक्रोसॉफ्टपासून लिनक्सपर्यंत सर्वांनीच आपल्या ऑपरेटिंग सिस्टिममधून दिला आहे. त्यात श्रेय घेण्यास कुठेच वाव नसल्याची लख्ख जाणीव असल्यामुळेच गांगल धूर्तपणे इंग्रजी स्पेलिंगवर आधारलेल्या फोनेटिककडे झुकलेले दिसतात. मात्र जगातील अनेक देशात कळफलकांवर त्या देशाची भाषा व इंग्रजी अशी द्वैभाषिक रचना असते. जग फिरलेल्या शुभानन गांगलांना हे चांगलेच माहीत असावे. तरीदेखील मराठीच्या बाबतीत ते फोनेटिकची भलामण करतात. केंद्र व राज्यशासनाने इन्स्क्रिप्टचा द्वैभाषिक कळफलक सर्व संगणकांवर अनिवार्य असण्याची कोणतीच व्यवस्था निर्माण न केल्यामुळे गांगलांसारख्या फोनेटिकचा उदोउदो करणाऱ्यांचे फावते.

४. याच पुस्तिकेतील 'रोमन लिपीच्या आधारे मराठी ग्लोबल करणे', 'संगणकाच्या आधारे मराठीने संगणकाचे विश्व काबीज केले आहे.' वगैरे अनेक मुद्दे निव्वळ असंबद्ध व बाष्कळ म्हणून दुर्लक्ष करायला हवेत; नाहीतर त्यांचा प्रतिवाद करण्यासाठी एक पुस्तिकाच लिहावी लागेल.

श्री० शुभानन गांगलांनी मांडलेले अनेक मुद्दे हे तद्दन अशास्त्रीय किंवा दिशाभूल करणारे असतात हे याआधीच मिलिंद मालशेसारख्यांनी सप्रमाण दाखवून दिले आहे. बहुजन समाजातील काही नेत्यांना गांगलांची 'शुद्धलेखन हटाव' पद्धती सोयीची वाटते. खरेतर संगणकाच्या जादुई दुनियेत प्रमाण लेखनाची अडचण संगणकीय शब्दकोशामुळे सहज सुटते. संगणकावर लेखन करताना त्यात होणाऱ्या प्रमाण लेखनाच्या व्याकरण व शुद्धलेखनदृष्ट्या त्रुटी सॉफ्टवेअरवर दाखवून पर्याय सुचवण्याची सोय इंग्रजीसाठी उपलब्ध आहे. तशीच सोय मराठीसाठीही करणे हा खरा उपाय आहे. उगीचच जातीयतावादी दृष्टिकोनातून प्रमाण लेखनावर आगपाखड करून गांगल या विषयाला चुकीचे वळण देत आहेत. अजून एक महत्त्वाची गोष्ट म्हणजे कोणत्याही टंकामुळे लेखनपद्धतीत बदल होत नसतो. फारफार तर तो टंक तयार करताना त्याचे वळण वर्णमालेशी सुसंगत आहे का एवढेच पाहता येऊ शकते. त्याचा संगणकावरील विशिष्ट पद्धतीने वापर करण्यासाठी शुद्धलेखन तपासनीस (स्पेलचेकर) व शब्दकोशाचेच साहाय्य घ्यावे लागते. त्याचप्रमाणे गांगलांचा टंकही 'शुद्धलेखनाचे शून्य नियम' असा चमत्कार तो

वापरताना घडवून आणू शकत नाही. अर्थात ज्यांना याची समज नाही त्यांना 'गिऱ्हाईक' बनवूनच इतकी वर्षं गांगलांनी स्वयंघोषित तज्ज्ञता आणली आहे हा भाग निराळा.

संगणकीय तंत्रज्ञानाचा पसारा अफाट आहे. त्यात असंख्य बारकावे आहेत व सर्वसामान्य माणसाला त्याची फारशी माहिती नसते. त्याचाच (गैर)फायदा घेताना **साखरभाषा वापरून, मराठीच्या भल्याचा कांगावा करत व क्रांतिकारक संशोधकाचा झगा पांघरून शुभानन गांगल संगणकीय मराठीच्या विकासाचे अतोनात नुकसान करत आहेत** अशी आमची धारणा आहे. याबाबत त्यांना वेळोवेळी अनेकांनी सांगूनही त्यांनी आपला हेका सोडलेला नाही. **निखालस खोटी व घोटाळेबाज माहिती देऊन आणि लोकांच्या अज्ञानाचा फायदा उठवून ते मराठीच्या भल्याचा जो आव आणत आहेत त्याला आमचा आक्षेप आहे.** जर शुभानन गांगलांना खरेच मराठीचे भले व्हावे असे वाटत असेल तर त्यांनी निरर्थक बुवाबाजी थांबवावी अशी त्यांना आग्रहाची विनंती. सुज्ञांस अधिक सांगणे न लगे! ■

ई-पत्ता : nvncom@yahoo.com, dreamil@gmail.com

दै० सकाळ (मुंबई) ६.८.२०१०

---

## परीक्षणासाठी आलेली पुस्तके

मोहनदास (दीर्घकथा) उदय प्रकाश. अनुवाद - सविता सावंत. लोकवाङ्मय गृह, मुंबई ४०० ०२५. जानेवारी २०१०. पृष्ठे ८०. किंमत रु० ८०/-

आत्मघाताचे दशक - प्रतिमा इंगोले. सोनल प्रकाशन, दर्यापूर ४४३ ८०३. फेब्रुवारी २००९. पृष्ठे २०८. किंमत रु० २५०/-

उदक्कार (कवितासंग्रह) प्रतिमा इंगोले. लेखिका पुस्तक प्रकाशन प्रकल्प, पुणे ४११ ०३८. जानेवारी २००९. पृष्ठे ९६. किंमत रु० ६०/-

लावण्ययोग - डॉ० श्यामला मुजुमदार. केशव भिकाजी ढवळे प्रकाशन, मुंबई ४०० ००४. पृष्ठे १९०. किंमत रु० १००/-

भारतीय लेखविद्या (इंडियन एप्रिग्राफी-दिनेशचंद्र सरकार) अनुवाद - डॉ० शोभना गोखले. कॉंटिनेंटल प्रकाशन. पुणे ४११ ०३०. २०१०. पृष्ठे ४७७+१२. किंमत रु० ३५०/-

■

# प्रकाशवाट : अनुवादांचा अनुवाद

सुमन बेलवलकर

[परीक्षित पुस्तक - प्रकाशवाट. अनुवादक - वंदना करंबेळकर. ग्रंथाली प्रकाशन, मुंबई. पृष्ठे १३३. किंमत १२५ रुपये.]

'प्रकाशवाट' या संग्रहातील मूळ कथा 'व्होल्गा' या स्त्रीवादी लेखिकेने तेलुगूमध्ये लिहिल्या. त्यांचे इंग्रजी भाषांतर 'द वूमन अनबाउंड' - अह्लादि उमा व एन० श्रीधर यांनी केले. व्होल्गा या हैदराबादला अस्मिता केंद्रात काम करतात. हे दोघे उस्मानिया विद्यापीठात प्राध्यापक आहेत. वंदना करंबेळकर यांनी हा अनुवाद इंग्रजीवरून केला आहे. कथांना पूर्वप्रसिद्धी 'मिळून साऱ्याजणी' या स्त्रीवादी मासिकात मिळाली आहे. 'प्रकाशवाट' या शीर्षकावरून जरी कथांच्या स्वरूपाची कल्पना येत नसली तरी 'द वूमन अनबाउंड' या शीर्षकावरून कथासंग्रहाच्या स्वरूपाची कल्पना येते. या कथा स्त्रीप्रधान आहेत. बायको, मुलगी, सहकारी-मैत्रीण, एकाकी विधवा, सासू-सून, वंध्या आणि अल्पवयीन बलात्कारित मुलगी अशा या कथांच्या नायिका आहेत. त्यांचे प्रश्न कथेच्या द्वारे मांडून लेखिकेने स्त्री-जगताचे वास्तव वाचकांपुढे आणायचा प्रयत्न केला आहे.

'प्रकाशवाट'ची नायिका सरस्वती पहिली मुलगी असूनही आंध्रमधील रूढीप्रमाणे तिचे नाव लक्ष्मी न ठेवता सरस्वती ठेवले होते. लग्नानंतर नोकरी करताना तिचा वकील नवरा पार्थसारथी तिचा पूर्ण ताबा घेतो. ती प्रत्येक शब्द आणि कृती त्याच्या मनासारखी करे. ती स्वतःची नोकरीदेखील आपल्या मनासारखी करत नव्हती. नवऱ्याने सांगितल्याबरहुकूम ती कागदपत्रांवर सह्या करत असते. अखेर तिचा सहकारी अनिलकुमार तिच्या डोळ्यांत झणझणीत अंजन घालतो आणि ती घटस्फोटाचा निर्णय घेते. 'अन्वेषी' कथेतील क्रांती ही सोळा सतरा वर्षांची मुलगी शिक्षणातली व्यर्थता समजून शिक्षण सोडून बसली आहे. तिचे बेबंद वागणे तिच्या आईवडिलांना समस्या होऊन राहिले आहे. शेवटी ही मुलगी घर सोडून जायचा निर्णय घेते. 'प्रयोग' या दीर्घकथेची नायिका सुनंदा आपल्या वडिलांच्या कटू अनुभवामुळे लग्न या संस्थेकडे एक अयशस्वी प्रयोग म्हणून पाहते. तिला मागणी घालणाऱ्या नरेंद्रच्या गळी ती आपले विचार उतरवते. नायक नरेंद्रचा

बायकोच्या धनपिपासू वृत्तीमुळे कोंडमारा होत असतो. 'साथसंगत'मध्ये पति-निधनानंतर मंगळसूत्र, लाल बांगड्या न उतरवणारी विजयालक्ष्मी घर स्वच्छ, सुंदर ठेवते. संगीत शिकते. तिचे शेजारी विधुर गंगाधर यांना तर असं वाटतं की, आर्थिक दृष्ट्या स्वतंत्र असणाऱ्या विधवा स्त्रियांपेक्षा विधुर पुरुषांनाच जास्त पोरकेपण येतं. शेवटी तीव्र एकाकीपणाचा अनुभव घेतल्यावर विजयालक्ष्मी त्यांचा लग्नाचा प्रस्ताव स्वीकारते. स्त्रियांना माणुसकीपासून दूर करण्यात आणि त्यांना असंवेदनशील करून पाषाणहृदयी बनविण्यात पुरुष खूप पटाईत असतात असे 'खरे शत्रू' मधले सूत्र आहे. रजनीकांतचा राग त्याच्या आईपर्यंत पोचविण्यासाठी अनुराधाने मध्यस्थाची भूमिका स्वीकारली आणि परिणामी सासूसुनेचे संबंध अगदी विकोपाला गेले. 'लग्न : एक राजकारण' कथेत नायक मधुसूदनच्या हाताची बोटं अपघातात तुटतात त्या वेळी नायिका त्याला धीर देते, पण तिचा गर्भपात होऊन तिला पुढे मूल होणे शक्य नाही असे दिसल्यावर तिला मात्र माहेरी पाठवले जाते. 'अयोनी' ही लैंगिक अत्याचारांना बळी पडलेल्या कुमारवयीन मुलीची कथा आहे. रोगी माणसांकडून पुन:पुन्हा झालेले बलात्कार सोसल्यावर तिची फक्त मरायची इच्छा आहे.

या सर्व कथा प्रामुख्याने घटनाप्रधान आहेत. त्यांची रचना फारशी गुंतागुंतीची नाही. त्यांच्या नायिका आपल्या वाट्याला आलेले भागधेय धीराने सहन करणाऱ्या आहेत. वृत्तीने त्या खंबीर आहेत. त्या दुबळ्या, परावलंबी नाहीत. 'अन्वेषी'तली क्रांती आईवडिलांना 'तुम्ही हुषार, पण सामान्य माणसं आहात' असे ऐकवते. 'प्रयोग'मधली सुनंदा 'पुरुषांना नेहमी ठाकून-ठोकून आकार देता येईल अशा बाहुल्या हव्या असतात' असे नरेंद्रला स्पष्टपणे सांगते. 'साथसोबत' मधली विजयालक्ष्मी 'पुरुष जेव्हा सोबतीबद्दल बोलतात तेव्हा त्याचा अर्थ सेवा असा असतो... मला चांगली मोलकरीण हवी आहे का चांगली सोबत?' असे गंगाधरांना आत्मपरीक्षण करायला भाग पाडते. आपल्यावर अन्याय झाला तर त्याचा धीटपणे प्रतिवाद करण्याइतक्या या नायिका धीरोदात्त मनोवृत्तीच्या आहेत. 'प्रकाशवाट'ची नायिका पूर्ण वैवाहिक जीवनात कधीही वैचारिक स्वातंत्र्याचा अनुभव घेऊ शकली नाही. पण अखेर ती स्वत:चा निर्णय घेते. अधिकारी म्हणून कागदावर सही करण्याचा आपला हक्क ती ठामपणे कृतीत उतरवते. तिला तिची प्रकाशवाट सापडते. या स्त्रिया आपल्या असहायतेचे भांडवल करीत नाहीत; उलट खंबीर, स्वतंत्र व्यक्ती म्हणून कुटुंबात, समाजात आपले स्थान प्राप्त करतात.

या कथा तेलुगूमधून अनुवादित झाल्या आहेत. अर्थात मध्यमवर्गीय नोकरदारांचे यांतले विश्व महाराष्ट्रात आणि आंध्रात फारसे वेगळे नाही. फक्त पहिल्या मुलीचे नाव लक्ष्मी ठेवणे, काही खाद्यपदार्थ, हुंड्याची पन्नास हजार रुपये रक्कम असे काही

सांस्कृतिक संदर्भ आंध्रमधील सामाजिक वातावरणाची जाणीव करून देतात. अनुवादिकेने हे वातावरण लीलया मराठीत आणले आहे. मूळ लेखिकेने कथेच्या मागणीनुसार 'लग्न : एक राजकारण' आणि 'अयोनी' या कथांमध्ये स्त्रीपुरुषांच्या जननेंद्रियांचे स्पष्टपणे उल्लेख केले आहेत. मराठीतही ते तसेच थेटपणे आले आहेत. त्यात जशी साळसूद लपवाछपवी नाही तसाच नाटकी धाडसीपणाही नाही.

हा अनुवाद इंग्रजीच्या मध्यस्थीतून मराठीत आला आहे. इंग्रजी वाक्यसरणीप्रमाणे मराठीत वाक्यरचना करण्याचे काही दोष इथे राहिल्याचे लक्षात येते. 'त्यांना लागलेली खूप भूक त्यांना सोसवत नाही' (२२); 'इडलीचा घास घशात अडकलेला, खाली घालवण्यासाठी तो घटाघट पाणी प्यायला' (४५); 'बाऊलमध्ये घालून गुलाबजाम व पाणी घेऊन आली' (५२); 'जेव्हा ती पुन्हा दहीभात वाढायला घेऊन गेली; वीराबाईंनी पुन्हा तोच प्रश्न विचारला' (१०२), 'एखाद्याबद्दल चटकन प्रेम करण्याची तिची पद्धत'(१०४); 'उगाच त्याला एखाद्या शुष्क झाडासारखं रडायला लावेल' (१२१); 'असा देव शिल्लक नव्हता की ज्याची त्यांनी पूजा केली नाही'(१२१), अशा काही रचना मराठीत खटकतात. वर्णनाच्या ओघात खटकणाऱ्या काही रचनाही क्वचित सापडतात. 'क्रांतीचा जन्म झाला. गिरीजाने आपल्या नातेवाइकांकडे क्रांतीला ठेवलं आणि ती आपल्या कामात गुंतली. त्यांच्यामुळे आणीबाणी उठली' (२६), हा कार्यकारण भाव न पटणारा आहे. 'दातओठ चावत' (खात) (३२), 'चेहरा गोरागोरा' (गोरामोरा) झाला (४५), 'मला रोज होणाऱ्या सूनवासाचा' (सासुरवासाचा) प्रश्न नव्हता (११६) अशा काही शब्दयोजना कदाचित नजरचुकीने राहून गेल्या असाव्यात.

एके ठिकाणी जगजीत सिंग आणि चित्रा सिंग यांनी गायलेल्या 'ये दौलत भी ले लो' गीताचा संदर्भ आहे. मुळातील 'बारीश का पानी'चा अनुवाद 'पावसाचे दिवस' असा केला आहे. 'वो छोटीसी रातें वो लंबी कहानी'चे भाषांतर 'मोठमोठ्या ज्या रात्री लहान झाल्या' असे दोन्ही ठिकाणी (७०) चुकले आहे.

एखाद्या अनुवादित पुस्तकाचे परीक्षण खरेतर ज्या पुस्तकाचा तो अनुवाद आहे त्या मूळ पुस्तकाशी ताडून व्हायला हवे! पण हा संग्रह अनुवादाचा अनुवाद आहे. त्यामुळे ते शक्य नाही. पुस्तकातला आशय या दृष्टीने मराठीत वेगळ्या प्रकारचे स्त्रियांचे भावविश्व या बंधमुक्त स्त्रीजीवनाच्या चित्रणातून आले आहे याचे श्रेय अनुवादिकेला द्यायला हवे.

■





अनुक्रमणिका

# खुंटणमिरची : मध्यमवर्गीय ब्राह्मण स्त्रियांचे विश्व

सुमन बेलवलकर

[परीक्षित पुस्तक :- खुंटणमिरची. लेखिका डॉ० लीला दीक्षित. प्रकाशक - पारस पब्लिकेशन्स, कोल्हापूर. २००९. पृष्ठे ३१८. किंमत ३१० रुपये.]

'खुंटणमिरची' हा डॉ० लीला दीक्षित यांच्या वीस कथांचा संग्रह आहे. खुंटणमिरची हा स्त्रियांचा एक परंपरागत खेळ आहे. सासुरवाशिणीला फेरात अडवून 'खुंटणमिरची जाशिल कशी?' असे फेर धरणाऱ्या बायका विचारतात. सासुरवाशीण संसारातली दु:खे सांगते. फेर धरणाऱ्या बायका 'बरं करीते/तो' असं उत्तर देतात. हरएक दु:खावर 'बरं करीतो' हे उत्तर आणि तिची सुटण्याची धडपड असा हा खेळ मंगळागौरीत हमखास खेळला जायचा. या शीर्षकावरून सूचित होते की, कथांमधले विश्व प्रामुख्याने स्त्रियांच्या व्यथावेदनांचे आहे.

डॉ० लीला दीक्षित यांच्या प्रबंधाचा विषय 'प्राचीन मराठी वाङ्मयातून दिसणारे स्त्रीदर्शन' (द्विरुक्ती सोडून द्यावी!) असा होता. तो 'प्राचीन मराठी साहित्यातील स्त्रीरूप' या नावाने प्रकाशित झाला आहे. त्यांनी विपुल अशी पारितोषिकप्राप्त बालसाहित्यनिर्मितीही केली आहे. यावरून स्पष्ट आहे की, स्त्रीजीवन हा त्यांचा खास अभ्यासविषय आहे आणि लेखनाचा त्यांना प्रदीर्घ अनुभव आहे.

वीस कथांच्या या संग्रहात विषयांची चांगली विविधता आहे. हक्काच्या दोन खोल्या मुलांसाठी विकून शेवटी वृद्धाश्रमात रवानगी होणे (अडगळ), गाण्याची आवड जोपासण्यासाठी मार्ग शोधणे (कस्तुरीगंध), मृताची नुकसानभरपाई मिळवण्याच्या लोभातून सावत्र मुलाऐवजी स्वत:च्याच मुलाचा बळी जाणे (इपरीत), मुकादमाच्या वासनेला बळी पडणारी मुंबईच्या चाकरमान्याची बायको (खोल खोल पाणी), संशयी नवरा परागंदा होणे (यात्रिक), जुन्या भाडेकरूंना फसवून जागा घेऊन वास्तू पाडणे (वास्तू), शिकलेल्या मोलकरणीची लग्नानंतर होणारी त्रिशंकू अवस्था (त्रिशंकू) भ्रष्टाचारी मुलाला राहते घर न देता ते शाळेला दान देणे (दान), नवऱ्याची बाहुली होण्याचे नाकारून नोकरीचा स्वयंनिर्णय घेणे (खुंटणमिरची), दहावी मुलगीच जन्मली म्हणून अनाथाश्रमात टाकलेल्या मुलीचा प्रश्न (प्रश्न), बाळगत्या मुलीवर लादलेल्या गर्भपाताने तिला वेड लागणे

(मनुआ), चोरीच्या आरोपात बायकोचे उभे आयुष्य जाळणारा न्यायाधीश (न्याय), भिन्न वृत्तीच्या पतिपत्नीमुळे संसार उद्ध्वस्त होणे (बेसूर), फॅशनच्या वेडापायी नवऱ्याने बायकोचे झोपेत केस कापणे (बाहुली), बळजबरीने सती जायला लावलेली किशोरी (सती), स्वत: चित्रे काढून नाव आणि श्रेय नवऱ्याला देणारी रमीजा (रमीजा), सचोटीने नगरसेविकेचे काम करू पाहणारी राजकारणी (नगरसेविका), पत्रकारितेच्या बदलत्या स्वरूपाला विरोध करणारी पत्रकार (निश्चय), आभासाच्या दुनियेत जगणारी मनोरुग्ण (भेट) आणि प्रत्यक्ष बापाकडून बलात्कार झालेली बारा वर्षांची मुलगी (एका विपरीताची गोष्ट) असे हे निरनिराळे विषय आहेत.

कथांमधील स्त्रिया बारा वर्षांपासून सत्तरी उलटलेल्या अशा निरनिराळ्या वयाच्या आहेत. एकदोन अपवाद सोडल्यास त्या सुखवस्तू मध्यमवर्गातल्या आहेत. (स्वयंपाकाची बाई रखमा आणि तिने उपमा खायला करून आणणे याची बरीच पुनरावृत्ती झाली आहे.) लेखिका स्वत: कोकणची असल्यामुळे माहेर आणि आजोळच्या रूपात कोकणातली गावे जास्त डोकावतात. या सर्व कथा प्रसंगप्रधान आहेत. मनुआ, रमीजासारख्या काही कथा व्यक्तिचित्रप्रधान आहेत. 'भारतीय परंपरेत अशी (अशा) अद्वैत भावनेने जगलेल्या स्त्रियांविषयी आपण ऐकलेले आहे. परंतु मुस्लिम परंपरेत वाढलेली एक स्त्री असे वागू शकेल?' (पृ० २१२) असे एक नेमकेपणा हरवलेले वाक्य 'रमीजा' कथेत सापडते. कथांमध्ये स्त्रियांची दु:खे, त्यांची तत्त्वनिष्ठा, त्यांचा स्वयंनिर्णय, परिस्थितीला तोंड देण्याची त्यांची जिद्द, कधी हरलेपण अशा निरनिराळ्या छटा दिसतात. पण त्या दु:खांचे भयानक वास्तव पुढे येत नाही. घटिताला वास्तवाचे रूप देणारा प्रतिभेचा स्पर्श होत नाही. उदाहरणार्थ 'यात्रिक' कथेत गर्भवती पत्नीला संशयाने टाकून जाणारा नवरा आहे आणि नायिका, एकदम डॉक्टर मुलगा (तोही नवऱ्यासारखा हुबेहूब दिसणारा म्हणून संशयाला जागा नाही), त्याची बायकामुले-मोटार यांच्यासह समोर येते. मधला सारा वणवा हा कथेचा विषय कथेबाहेरच राहतो. 'एका विपरीताची गोष्ट' मदत करणाऱ्या प्रौढ स्त्रीची कामे पटापट होऊन त्या माणसाला शिक्षा होते इथे संपते. बारा वर्षांच्या मुलीचे मोडून जाणे 'थोडक्यात वर्णन' या सदरात येते. प्रत्यक्षात बलात्कारापेक्षाही पुढे वाढून ठेवलेले विपरीत जास्त भयानक असते. 'बाहुली' कथेत नवरा स्वत:ची आवड म्हणून बायकोचे केस झोपेत कापून बॉब करतो. 'हे सती जाणेच होते' असे वर्णन लेखिका करते.

एकूणच या कथांमध्ये काही दु:खांचे, संकटांचे 'वर्णन' येते; त्यांचे गुंतागुंतीचे विश्लेषण, त्यातून होणारे वास्तवाचे चटके देणारे दर्शन, मानवी विश्वाचा बहुरूपी

अनुभव आणि एकूणच कथांच्या तुकड्यांमधून का होईना, होणारे 'जीवन-दर्शन' यांचे प्रत्ययकारी चित्रण होत नाही. या कथा वाचकाची पाठ न सोडण्याइतक्या अस्वस्थ करत नाहीत.

कथा वाचत असताना ठळकपणे लक्षात आलेली एक गोष्ट म्हणजे 'इपरीत', 'खोलखोल पाणी' आणि 'रमीजा' या तीन कथा सोडल्यास सर्व कथांचे विश्व ब्राह्मणी, त्यातही खास कोकणस्थांचे आहे. त्रिशंकू, मनुआ या मोलकरणी ब्राह्मण घरातल्या आहेत आणि 'भेट', 'एका विपरीताची गोष्ट'मधली साक्षीदार लेखिकाही उच्च मध्यमवर्गीय ब्राह्मण आहे. नायिकांची आणि त्यांच्या गोतावळ्याची सर्व आडनावे दामले (दोनदा). पोंक्षे, पटवर्धन, वैद्य, मिराशी, साठे, आगाशे, साने (३), पाध्ये (२), लिमये (२), गोळे, परांजपे, फाटक, पाटणकर (२), पाठक, केळकर, ओक, वझे, गोखले (३) आठवले, बर्वे, पानसे, आपटे (२) सोहोनी, उपाध्ये, चाफळकर, वर्तक, लुकतुके, म्हसकर, डोंगरे (चू०भू०द्या०घ्या०) अशी आहेत. कथांमध्ये येणारी गौण पात्रे कारणपरत्वे इतर आडनावांची आहेत. पण मुख्य कथाविश्व कोकणातून आलेल्या कोकणस्थ नायिकांचे आहे. यावरून कथासंग्रहाला कोकणस्थ स्त्रियांचे विश्व म्हटल्यास ते वावगे ठरणार नाही. परिणामी नायिकांच्या वर्णनात तोच तो केतकी वर्ण, केसांचा मोरपिसारा येतो. गालावरच्या खळीचीही पुनरावृत्ती झाली आहे. अशा नायिका आपापल्या हाडापेरानिशी जिवंत होऊन डोळ्यांपुढे उभ्या राहात नाहीत. शिवाय लेखिका म्हणून अनुभवविश्वाला असे कुंपण पडणे फारसे हितावह नाही. इतक्या सगळ्या गोष्टी एका वर्गात घडतात आणि 'इपरीत' व 'एका विपरीताची गोष्ट' (दोन्ही विपरीतच) मात्र या वर्गात घडणे शक्य नाही असे लेखिकेला वाटते.

लेखन करताना लेखिकेने निवेदकाची शैली वापरली आहे. त्यामुळे स्वतः लेखिका असल्याचे उल्लेखही मधूनमधून येतात. कुठेतरी घडलेल्या गोष्टी मिळवून, ऐकून लेखिका कथेचे सूत्र जुळवते असे दिसते. निवेदकाच्या शैलीमुळे लेखनात प्रत्यक्ष प्रत्यय येत नाही. लेखिका स्त्री असल्यामुळे स्वयंपाक, खाद्यपदार्थ, स्त्रियांचीच केशभूषा-वेशभूषा यांचे तपशील जास्त येतात. 'एका विपरीताची गोष्ट' मध्ये तर बलात्कारित मुलीपेक्षाही लेखिकेचे लक्ष वकील स्त्रीची केशभूषा-वेशभूषा यांचेच वर्णन करण्याकडे जास्त जाते. असे लिहिण्यामुळे लेखनावर एक स्त्रीत्वाचा शिक्का बसतो.

लेखिकेची भाषा निवेदनाला अनुरूप अशी ओघवती आहे. या भाषेला खांडेकरांप्रमाणे रूपकांची ओढ आहे. स्वप्नांचे झुंबर (३५), भीतीचा पातळ

पापुद्रा (३९), जीवनाची दीपमाळ (६८), संशयाचा नाग (७०), मधमाशीच्या मोहळासारख्या आठवणी (तीनदा), स्मृतीचे मणी (१४३), मनाचं झाकण विचाराच्या वाफेनं उडून गेलं (१४९), मनातला गुलमोहर (१६३), प्रश्नांच्या फुलझड्या (१७४), दु:खाची अत्तरकुपी (१८३), काळाच्या गुहेत (१९१), मनाचे पाखरू (२२२), दु:खाचा झरा (२९१), अशी अनेक रूपके लेखिका वापरते. काहीशा कृत्रिम वाटणाऱ्या वाक्यांचा आढळही या कथांच्या वर्णनशैलीत होतो. 'एखाद्या शांत जलाशयातून एखादे टवटवीत कमळ अचानक वर यावे तसे झाले.' (३०) (कमळ अलगद वर येऊ शकेल; अचानक नाही) स्तनपान करून तृप्त झालेल्या बालकासारखी सृष्टी; (४७), रामच सीतेला रावणाकडे जायला सांगतोय (६३), त्या विषाने संसाराचे अमृतमय दूध नासून टाकले (६६), डूल हलावे तशी पिंपळाची पाने हलत होती (१०१), प्रश्नाच्या पाकळ्यांनी कमळ मिटले होते; भुंगा आत घुमत होता; (१७२), अशा प्रकारची शैली आता जुनी वाटते. शिशाचे रस (६३), लिंग्विस्टिक (????) (११३), स्टॅटिस्टिक (१४८), वज्राघात कोसळावा (१४५), पिढीजात 'घरंदाज' माइनचा व्यवसाय (२०९) असे चुकीचे शब्दप्रयोग लेखिकेने वापरले आहेत.

लेखिकेच्या भाषेला असलेला प्रादेशिकतेचा एक विशेष मात्र कथांच्या शैलीला जिवंतपणा आणून देतो; डोक्यात भुरी लागणे (९), खांडव (३३), केळीच्या अगोतलीवर (८२), अळूवड्यांचा ओंडा, काविथा (९३), पोटात निवडुंगे उगवणे (९५), वृक्षांचे झिंट (९५), उचीबुची शेते (१११), चांदीच्या तुलुमड्या (१३१), पोफळीची फागोरी (१६७), हजार-मोगऱ्याच्या घोम्यात; ओकबोकटीचे फूल (१६८), तळहाताची तीर्थोटी (१७२), आंबेफणस हापसायला (१७४), ओटी भरण्यासाठी आचणी (१८४), अशा खास बोलीतल्या शब्दांनी चांगली वातावरणनिर्मिती होते.

प्रामुख्याने मध्यमवर्गीय ब्राह्मणी स्त्रियांना कोणत्या वेगवेगळ्या प्रसंगांना तोंड द्यावे लागते याचे वर्णन करणाऱ्या या कथा आहेत.

■

फ्लॅट 2 ए3 'सितार', नादब्रह्म हाउसिंग सोसायटी, वारजे, पुणे 411 058
स्थिरभाष : (020) 2523 4142
चलभाष : 090289 98199





अनुक्रमणिका

# मोहनदास : आवर्जून वाचण्याजोगी कथा

जया परांजपे

[परीक्षित पुस्तक : मोहनदास - उदय प्रकाश. अनुवाद : वनिता सावंत. लोकवाङ्मय गृह, मुंबई. २०१०. पृष्ठे ८०. किंमत रु० ८०.]

समकालीन भारतीय साहित्यातील एक अग्रगण्य कथाकार म्हणून नावलौकिक असलेल्या श्री० उदय प्रकाश यांची 'मोहनदास' ही हिंदीतील दीर्घकथा वनिता सावंत यांनी मराठी वाचकांपर्यंत पोहोचविण्याचे मोलाचे काम याच शीर्षकाच्या अनुवादाने केले आहे.

सामान्य, दीन-दुबळ्या, पिचलेल्या व शोषणाला बळी पडणाऱ्या माणसांबरोबर नेहमीच आपल्या समर्थ लेखणीद्वारे उभे राहणारे हिंदीतील कथासम्राट प्रेमचंद यांच्या १२५व्या जयंतीचे औचित्य साधून 'हंस' पत्रिकेने ऑगस्ट २००५च्या अंकात ही कथा प्रसिद्ध केली, याचे खास वैशिष्ट्य व महत्त्व ही कथा वाचल्यावर सहज लक्षात यावे.

सत्तांध व धनदांडगे लोक आणि भ्रष्ट व्यवस्था यांच्या चक्रात गरीब व अगतिक माणसाचे होणारे शोषण व त्याविरुद्ध उभं ठाकण्याची धडपड हे साहित्यात अनेक वेळा आलेले व थेट काळ्या-पांढऱ्या रंगात रंगविले जाऊ शकणारे आशयसूत्र उदय प्रकाश या कथेमध्ये इतक्या नव्या व वेगळ्या ताकदीनं उभं करतात की त्यामुळे ही कथा या दशकातील सर्वोत्तम कथांमध्ये स्थान प्राप्त करते.

कथेचा नायक मोहनदास मध्यप्रदेशातील पुरबनरा या छोट्या गावातील चटया-टोपल्या विणणाऱ्या बंसहर पलिश या खालच्या जातीतील गरीब पण होतकरू तरुण आहे. उपचाराअभावी दम्यानं जर्जर झालेले वडील, आंधळी झालेली आई, सावलीसारखी पाठीशी उभी राहणारी बायको व दोन समंजस छोटी मुलं असलेल्या या कुटुंबाची कधीतरी पैसा देणारा पारंपरिक व्यवसाय व निसर्गाच्या लहरीनुसार काकडी, टोमॅटोसारखी फुटकळ पिकं देणारी नदीकाठची जमीन हीच काय ती उत्पन्नाची साधनं आहेत. तो मेरिटमध्ये बी०ए० पास झाल्यावर साऱ्या कुटुंबाच्या आशा पल्लवित होतात की आता घरात नियमित पैसा येऊन दोन वेळच्या भाकरीसाठीचा संघर्ष संपेल. पण नोकरीसाठी धडपडत असताना आजच्या समाजात गुणवत्तेपेक्षा पैसा व पत वरचढ आहे ह्या दुःखद वास्तवाला त्याला सामोरे जावे

लागते. परिस्थिती त्याला आपल्याच पहिल्या बाळाच्या जन्माकडे खाणारं एक पोर वाढलं म्हणून बघायला लावते. तेवढ्यात ओरिएंटल कोल माईन्समध्ये डेपो सुपरवायझरच्या पदावर त्याची नेमणूक होते. पण तसे पत्र त्याला कधीच मिळू शकत नाही आणि तो तिथे हजर होऊ शकत नाही. त्यासाठीची जीवघेणी प्रतीक्षा व निष्फळ चकरांनी त्याच्या मनातील आशेचे धुमारे पार कोळपून जातात आणि उरतो जगण्याचा संघर्ष. त्यातच एके दिवशी आपल्या पदावर आपल्याच नावाने नगेंद्रनाथ नावाच्या बड्या असामीचा विश्वनाथ (बिसनाथ) प्रसाद हा मुलगा गेले काही वर्षे नोकरी करत आहे हे सत्य त्याच्या समोर येते आणि तो दिङ्मूढ होतो. आपण खरे मोहनदास असून बिसनाथ मोहनदास नाही हे सत्य पटवून देण्याची त्याची धडपड धन व बळाच्या जोरावर चिरडून टाकली जाते. मोहनदास मनाने पार कोलमडून जातो. परिस्थितीशी मिळते घेत जीवन कंठत असताना अचानक हर्षवर्धन सोनी नावाचा एक तरुण वकील त्याच्यासाठी कायद्याची लढाई लढण्यास पुढे येतो, पण तेथेही भ्रष्ट शासनव्यवस्था आणि सुखलोलुप नोकरदारांच्या मदतीने खोटे पुरावे सादर करून त्याला कायदेशीरपणे बिसनाथ बनवले जाते. पुन्हा एकवार गजानन माधव मुक्तिबोध नावाचे न्यायनिष्ठ व विवेकी न्यायाधीश व्यक्तिगत कायदेशीर चौकशी करून मोहनदासला न्याय मिळवून देतात. बिसनाथ व त्याच्या साथीदारांना अटक करवतात. तिथे बिसनाथ मोहनदास नावाने जामीनावर सुटतो आणि बाहेर पडल्यावर मोहनदासने मिळवलेल्या न्यायाची शिक्षा म्हणून आपले सगळे गुन्हे मोहनदासचे ठरवून त्याचा पोलिसांकरवी अनन्वित छळ करवतो. शेवटी 'मी लिहून द्यायला तयार आहे की मी मोहनदास नाही... मला जगू द्या हो!' अशी तो गयावया करतो. सत्य कायद्याने सिद्ध करण्याची मोहनदासची जीवघेणी व निष्फळ धडपड आणि अगतिकता मन हेलावून टाकणारी तर दुसरीकडे विश्वनाथ प्रसाद, ए०के० श्रीवास्तव, विजय तिवारी, पटवारी कमल किशोर व त्यांच्यावर वरदहस्त असणारे राजकीय पुढारी यांच्या कुटिल कारवाया, फसवणुकीचे नियोजनबद्ध तंत्र आणि कौर्य संताप व उद्वेग निर्माण करते. हा मोहनदास लेखकाने स्वतः म्हटल्याप्रमाणे पुरबनरा ऐवजी कुठल्याही गावात आढळणारा 'अपने आँसु के साथ इस समय में चुपचाप जीनेवाले लोगों'चा घटक बनतो व कथेतील काल्पनिक पात्र न राहता साक्षात वास्तव बनून समोर येतो. याच वेळी कंसात दिलेले जागतिक घडामोडींचे संदर्भ कथेच्या अवकाशाची व्याप्ती वाढवून आजच्या काळातील वैश्विक सत्याचा साक्षात्कार घडवून आणतात. वैशिष्ट्य हे की या सगळ्या करुण, क्रूर वास्तवानं वेढलेला मोहनदास कथेमध्ये कधीही जीवन संपविण्याचा विचारही करताना दिसत नाही. गुणवत्तेच्या जोरावर नोकरी मिळवणारे किमान ५-१० टक्के लोक, कुटुंबातील प्रेम आणि समजूतदारपणाची ऊब, मित्रांबरोबर घालवलेले चार

आनंदाचे क्षण, हर्षवर्धनसारखा एखादा न्यायनिष्ठ वकील, आजच्या जगात 'असंभव स्वप्न व दुर्लभ फँटसी' सारखा असणारा मुक्तिवाद्यांसारखा न्यायाधीश, व 'न्यायाची आकांक्षा कालातीत असते' या सत्याचा साक्षात्कार मोहनदासच्या जीजीविषेचं रहस्य यांत असेल का - असेल तर कथेची खरी परिणामकारकता हर्षवर्धन व मुक्तिबोध निर्माण होण्यात मानावी लागेल.

अनुवादाच्या अंगाने कथेचा विचार व अभ्यास करत असताना प्रकर्षाने जाणवणारी गोष्ट म्हणजे हा अनुवाद सर्जनशील असण्यापेक्षा शब्दानुसारी जास्त आहे. त्यामुळे घटना व प्रसंग चित्रणाची साधी-सरळ भाषा मराठीत आणत असताना अनुवादात भाषेची रचना व आशय दोन्ही दृष्टींनी समांतर जाणारी बरीच स्थळं (पृ० १०, १८-१९, ३८, ४६ इ०) दाखवता येतील. ती चांगल्या अनुवादाची द्योतक आहेत. यामुळे वाचक कथेशी समरस होऊन वाचत जातो.

पण या आस्वादनाच्या प्रक्रियेला क्षणिक खंडित करणारी, खटकणारी तर कधी अर्थ व भावनेच्या छटेत उणेपणा आणणारी स्थळंही येतात. ''धावपळीने वेढलेला दिसतो'', ''सन्नाटा वातावरणात सूं-सूं करत वाजत होता'', ''शरीराच्या पिंजऱ्यात वत्सलतेचा रस काठोकाठ भरलेला आहे'', ''स्वत:कडील अभाव, चेहऱ्यावर हास्य नाचत होते'', ''त्याच्या हास्यात भरीवपणा सतत वाढत राहिला'', ''नजर वरती सरकली'', ''इतिहास घेरून टाकेल'', ''चेहऱ्यावर वेदनेच्या रेषा चित्रित झाल्या'', ''थकव्याने मनात मुक्काम ठोकायला सुरुवात केली'' इ०. मराठीचा बाज नसलेली अशी भाषा टाळता आली असती.

शब्दप्रयोग व क्रियापदांच्या रूपांबाबतही काही ठिकाणी भ्रामक स्थिती निर्माण झाल्याने वाचनात अशी भाषा खटकते. उदा० 'चाट डाला'साठी अंगचटीला येणे, 'स्वाभिमान'साठी अभिमान, 'पहुँच'साठी शिरकाव, साहित्यातील 'शिल्प'साठी निर्मिती, 'किलकारी'साठी चीत्कार, 'कूटाख्यान'साठी उपहासकथा अशांसारखे शब्दप्रयोग तर कुठे-कुठे अर्थालाही बाध आणतात.

याच संदर्भात काही क्रियापदांची रूपंही पाहण्याजोगी आहेत. 'मुझे बचा लीजिए - किसी तरह बचा लीजिए - मैं हाथ जोडता हूँ।' या ठिकाणी वाचवा, वाचवाच व वाचवायला हवं अशी रूपं योजलेली आहेत. यामध्ये मूळ विधानातील आगतिकता व गयावया करण्याचा भाव व्यक्त होत नाही. उलट त्यातून काहीसा आदेशाचा सूर उमटतो. सरकार बैंक से लोन दिलाती है - द्यायला लावते (देववते किंवा देण्याची व्यवस्था करते - हे रूप योग्य होऊ शकले असते.) तबदला करा दिया - बदली करायला लावली (करवली, आपल्या अधिकारात करवून घेतली अशी रूपे वापरली जाऊ शकतात.) कभी रंग लाल रहा होगा - रंग लाल होत असेल, कत्थई हो चुका था - तपकिरी झालेला.

हिंदीतील 'रहना' क्रियापदाची ही रूपं पाहा : नजर अटकत राहिली होती. कमिट्या बनवत राहिले. रांगत राहिली होती. डोळे वाचवत राहिला. बलात्कार केला जात राहिला. केस सफेद होत रहात. काळ भयावह होत राहिला आहे.

हिंदीमध्ये हे क्रियापद मूळ क्रियादर्शक शब्द व क्रियेचे सातत्य दाखविणारे साहाय्यक क्रियापद म्हणून वापरले जाते. मराठीतही या दोन्ही प्रकारे हे क्रियापद वापरले जाऊ शकते, पण सर्वत्र नाही; हे वरील संदर्भात स्पष्टपणे जाणवते.

अनुवाद-प्रक्रियेमध्ये आवश्यकता व अपरिहार्यता यांमुळे ध्वनीपासून प्रोक्तिपर्यंत सर्व स्तरांवर बदल केले जातात. या अनुवादातही असे बदल केलेले आहेत. ते बरेचसे स्वाभाविक व अर्थवाही आहेत. उदा० बड़ा आदमीसाठी धेंड, बहुत सरलसाठी भलताच सरळ, छद्मसाठी लटका, अफसरसाठी हपिसर असे वापरलेले शब्द त्या-त्या ठिकाणी अर्थाला उठाव देणारे आहेत. वाक्यातील शब्दांचे स्थान वा क्रम यांमध्ये केलेल्या बदलांची संख्या खूपच जास्त आहे, पण त्यामध्ये मराठीचा बाज जपण्याचा प्रयत्न आहे आणि मूळ अर्थाला बाध येणार नाही याची काळजीही घेतलेली आहे. वाक्यरचनेच्या स्तरावर मराठीचे वळण जपण्यासाठी काही ठिकाणी बदल केले आहेत. जसे - 'गाँव के लोग कहते हैं कि दोनों को ... देखा नहीं गया' --- 'दोघांना ... कधी पाहिलं नाही असं लोक म्हणतात'.

या संदर्भात नमूद करावी अशी विशेष गोष्ट म्हणजे संपूर्ण कथेमध्ये 'मिश्रवाक्य' रचना ही लेखकाच्या शैलीचं वैशिष्ट्य म्हणून दाखवता येईल इतकी जास्त आहे. अशी वाक्यरचना विशेष उद्देशाने केलेली आहे हे निश्चित. पण अनुवादामध्ये अनेक ठिकाणी (जवळपास ३०-४०) मूळ मिश्रवाक्यासाठी स्वतंत्र छोटी वाक्यं किंवा संयुक्त वाक्यरचना केलेली दिसते. या सर्वच ठिकाणी नाही, तरी काही ठिकाणी अर्थाच्या दृष्टीने परिणामकारकता कमी झालेली आहे.

मूळ रचनेतील बोलीभाषा हा अनुवादाच्या दृष्टीने प्रश्न असतो. कथासाहित्यात पात्र व वातावरणात अस्सल जिवंतपणा व स्थानीय रंग भरण्यासाठी बऱ्याच वेळा बोलींचा उपयोग केला जातो. याही कथेत तसा केला आहे. हिंदीतील बोलीचा मराठीतील कोणत्या बोलीत अनुवाद करावा हा प्रश्न निर्माण होतो त्यावर उपाय म्हणून बऱ्याच वेळा बोलींचा प्रमाण-मराठीत अनुवाद केला जातो.

या अनुवादात बोलीच्या भाषांतरात एकरूपता दिसत नाही.

※ काही ठिकाणी कथनाचा अर्धा भाग बोली (मूळ हिंदी)त व उरलेला भाग प्रमाण-मराठीत दिला आहे. (पृ० १६, २३, २७, ३०, ३४, ४३, ५५)

※ काही ठिकाणी मूळ हिंदी बोली मराठीत तशीच ठेवली आहे. (पृ० १९, २४, २५, ५१, ५२, ५६, ६३, ६६ इ०)

⁂ काही ठिकाणी मूळ हिंदी बोलीचा प्रमाण-मराठीत अनुवाद केला आहे. (पृ० ११, २७. ६७ इ०)

भाषांतरणाशी प्रत्यक्ष संबंध नसलेला पण महत्त्वाचा असणारा एक मुद्दा इथं नोंदवायला हवा. मूळ कथेत कंसात व वेगळ्या टाइपमध्ये छापलेले संदर्भ हे कथेच्या रचनातंत्राचा भाग व वैशिष्ट्य असल्यामुळे अनुवादातही तसेच देणे अगत्याचे होते.

हिंदीतील गजानन माधव मुक्तिबोध, हरिशंकर परसाई, शमशेर बहादूर सिंह, श्रीकांत वर्मा, नेमिचंद्र जैन, प्रेमचंद इ० साहित्यिकांचे उल्लेख लेखकाच्या प्रातिभ कल्पनेचे द्योतक व खास उद्देशांनी आलेले आहेत. मराठीतील सर्व वाचकांपर्यंत ते त्याच अर्थाने आणि विशेष संदर्भात पोहोचतील असे म्हणता येणार नाही. पण साहित्यिकांच्या सामाजिक बांधिलकीचा संकेत त्यातून पोहोचू शकतो.

हिंदी पुस्तकातील काहीशी अमूर्त चित्रं मराठी पुस्तकात अधिक बोलकी, आशय व पात्रांना उठाव देणारी आहेत. अनुवादात काही शब्द वा वाक्यांश नजरचुकीने गाळलेले आहेत. काही मुद्रणदोषही आहेत.

आवर्जून वाचावी अशी हिंदीतील कथा मराठी वाचकांना उपलब्ध करून दिल्याबद्दल वनिता सावंत यांचे अभिनंदन करायला हवे.

■

फ्लॅट क्र० 6, नवकविता हाउसिंग सोसायटी, 45, औंध रोड, खडकी,
पुणे 411 020, स्थिरभाष : (020) 2569 4915

## निसर्गाची लिपी

''अहो इकडे गवार किंवा वाज्याच्या शेंगांना कुणी गवार म्हणत नाही. ह्या शेंगा म्हणजे 'खाजगावची पाटलीन.' कुणी प्रेमात पडून बेचैन दिसला तर 'वीसनखी चावली'. कुणाच्या भावना अनावर झाल्या तर 'झेंडू दादून आला.' काय ही शब्दांची दुनिया, लिपी निसर्गाची आणि भाषा माणसांची. मस्त सांधा जुळलेला. बोली वाहत्या झऱ्यासारख्या निर्मळ. लाल, काळ्या, पिवळ्या, पांढऱ्या अशा कितीतरी प्रकारच्या मातीशी संपर्क आणि झाडाझुडुपांच्या, रानवेलींच्या मुळांतील अर्क लाभलेल्या बोलीतील शब्द म्हणजे निसर्गातील रंगगंधाचा करिश्मा!''

- डॉ० मधुकर वाकोडे
'आपले वाङ्मयवृत्त', ऑगस्ट २०१०, पृष्ठ ६

# नकारार्थाचे विश्लेषण

धनंजय वैद्य

संदर्भ : संपादकीय, 'भाषा आणि जीवन' हिवाळा २०१०

'अर्थाच्या विभाजक रेषा' या संपादकीय लेखात नीलिमा गुंडी यांनी विरुद्धार्थी शब्दांची कल्पना संदिग्ध असल्याबद्दल विचार केलेला आहे. विरुद्धार्थी शब्द (ऐच्छिक वि० सक्तीचे) आणि अभावार्थी शब्द (ऐच्छिक वि० अनैच्छिक) असे दोन प्रकारचे शब्दार्थनिषेध असतात, ही बाब त्यांनी लक्षात आणून दिलेली आहे.

या बाबतीत संस्कृत वैयाकरणांचे विवेचन मूलगामी आहे. नागेशाच्या परमलघुमंजूषेमधील काही ठळक मुद्दे येथे देत आहे. (सोयीसाठी वाक्यांचा क्रम, उदाहरणे वगैरे बदललेली आहेत.)

नागेशाने भर्तृहरीच्या वाक्यपदीयातली एक कारिका उद्धृत केलेली आहे :

'सारखेपणा, अभाव, वेगळेपणा, कमी प्रमाण, निंदा आणि विरोध हे नकाराचे सहा अर्थ होत.'

उदाहरणे :

१) गाढवाच्या संदर्भात 'हा घोडा नाही' म्हणता 'घोड्याशी साम्य आहे, पण घोडा नाही' असा अर्थ कळतो.

२) अभावाचे दोन प्रकार नकाराने कळतात :

२अ) अत्यंताभाव : 'घरात घडा नाही' म्हणजे केवळ आणि पुरते नसणे

२आ) अन्योन्याभाव : 'घडा हा कपडा नाही' घडा आणि कापड यांच्यात एकमेकांशी तादात्म्याचा अभाव आहे.

३) वेगळेपणा : 'मनुष्य नसलेला प्राणी' म्हटले तर मनुष्यापासून वेगळेपणा कळतो.

४) 'बाईला कंबरच नाही' येथे कंबर लहान असल्याचे सूचित होते.

५) पुरुषाला उद्देशून 'पुरुष नाही' म्हटले तर निंदा कळून येते.

६) 'अधर्म' शब्दामध्ये 'धर्माचा विरोध' असा अर्थ कळतो.

पैकी अनेक अर्थ लाक्षणिक आहेत. संदर्भ बघितल्यावरच अर्थ लाक्षणिक आहे, असे समजून येते. व्याकरणाच्या अर्थप्रक्रियेत म्हणावे तर दोनच प्रकार विश्लेषणयोग्य आहेत. नागेश म्हणतो : 'नञ् (संस्कृतातला नकारार्थी शब्द) दोन प्रकारचा असतो. पर्युदास (वेगळेपणा) आणि प्रसज्यप्रतिषेध (निषेध).' वा०बा० भागवत या वाक्याबद्दल टिप्पणीत अनुक्रमे उदाहरणे देतात : पर्युदास - 'अमांसं भक्षयेत्।', प्रसज्यप्रतिषेध 'मांसं न भक्षयेत्।'. 'निरामिष खावे,' येथे मांसावेगळे काहीतरी खायचा अनुरोध आहे; तर 'मांस खाऊ नये' मध्ये केवळ काय खाऊ नये त्याबद्दल प्रतिषेध सांगितला आहे.

नागेशाने हे दोन अर्थ वेगळे काढले आहेत, कारण याचे पदाच्या अर्थान्वयाच्या दृष्टीने विश्लेषण होऊ शकते. पर्युदासात नकाराचा अन्वय नामाशी लावायचा असतो. उदाहरणार्थ : क्षत्रियामध्ये ब्राह्मणत्वाची खोटी कल्पना करून त्याला तात्पुरते ब्राह्मण म्हणावे, मग त्या तात्पुरत्या कल्पनेचा निषेध करायचा. अब्राह्मण = तो ब्राह्मणावेगळा (क्षत्रिय) आहे, असे कळते. मात्र प्रसज्यप्रतिषेधात नकाराचा अन्वय क्रियापदाशी असतो. 'ब्राह्मण नाही दिसत', येथे कोणी वेगळे दिसते असा अर्थ मुळीच कळत नाही. ब्राह्मण दिसण्याचा निषेध होतो, इतकेच. संस्कृतात असे सनास अपवादानेच दिसतात.

पर्युदासाची समांतरता नीलिमा गुंडी यांच्या 'विरुद्धार्था'शी दिसते, तर प्रसज्यप्रतिषेधाची समांतरता त्यांच्या 'अभावार्था'शी दिसते. 'विसंवाद घडला' म्हणजे वाद संवाद आहे अशी तात्पुरती कल्पना करायची, आणि मग त्याचे खंडन करायचे - 'संवादाच्यापेक्षा वेगळा वाद घडला' - लाक्षणिक अर्थ 'कडवट वाद घडला'. लक्षात घ्यावे, येथे काहीतरी घडल्याचा नकार नव्हे. उलट काहीतरी घडलेच आहे. नकाराने नामाचा अर्थ बदलतो, म्हणून नकार हे नामविशेषण आहे. 'असंवाद घडला' मध्ये मात्र 'संवाद नाही घडला' असा अर्थ कळतो. येथे नकाराचा अर्थान्वय वाक्यातील क्रियापदाशी होतो. काही घडल्याचा नकार आहे. नामाचा अर्थ मात्र जसाच्या तसा आहे. येथे नकार (अर्थप्रक्रियेमध्ये) क्रियाविशेषण आहे. क्रियाविशेषण असूनही नामाशी समास होऊ शकतो, हे नञ् समासाचे वैचित्र्य आहे.

नीलिमा गुंडी यांचे संपादकीय पुढे सांगते की अर्थवलयांच्या धूसरतेमुळे तात्त्विक पेच निर्माण होतात. त्या पेचांमधून निर्माण होणाऱ्या विसंवादांची सुयोग्य उदाहरणे संपादकीयात दिलेली आहेत - 'सश्रद्ध/अश्रद्ध/अंधश्रद्ध', वगैरे. तरी, काही प्रमाणात ही अर्थसंदिग्धता व्याकरणाच्या क्षेत्रातून घालवण्यासारखी आहे. किमानपक्षी अर्थसंदिग्धतेचे मूळ ज्या अन्वयसंदिग्धतेमध्ये आहे (नकाराचा अर्थान्वय

नामाशी की क्रियापदाशी) त्यावर व्याकरणाच्या अभ्यासातून प्रकाश पडू शकतो. पुष्कळदा अन्वयाची संदिग्धता वाक्याच्या हेलावरून किंवा बलवितरणावरून पुरती नाहीशी होते. तशा परिस्थितीत अर्थाची संदिग्धताही लेखन-वाचनातील 'दृष्टिभ्रम' म्हणून कळून येते. बोलण्या-ऐकण्यात कदाचित 'अश्रद्ध आणि अ'श्रद्ध या बलवितरणांत प्रसज्यप्रतिषेध आणि पर्युदास कळून येत असावा - याबाबत सर्वेक्षण करणे गरजेचे आहे.

मराठी व्याकरणाच्या एका अनुत्तरित समस्येची जाणीव नीलिमा गुंडी यांनी करून दिलेली आहे. त्याचे उत्तर भर्तृहरि-नागेशांचे अंधानुकरण करून मिळेल, असे माझे मत नाही. परंतु संस्कृतामधील चर्चेतून जर कुठले विश्लेषणबीज मिळत असेल, तर उत्तर शोधण्यातले कष्ट कमी होतील. त्या बीजाचा स्वतंत्र विकास मात्र मराठी व्याकरणाची साधनसामग्री वापरूनच करावा.

**संदर्भ :**

परमलघुमंजूषा (भाषेच्या स्वरूपाची तात्त्विक भूमिका मांडणारा नागेशभट्ट-लिखित ग्रंथ) : भाग पहिला (मूळ व मराठी अनुवाद) व भाग दुसरा (प्रकरणशः परिचय व स्पष्टीकरणात्मक टीका) अनुवादक आणि टिप्पणीकार : वा०बा० भागवत, व्याकरणपारंगत, परामर्श प्रकाशनमाला, पुष्प चवथे. पुणे विद्यापीठ, तत्त्वज्ञान विभाग, पुणे

■

साहाय्यक प्राध्यापक, जॉन्स हॉप्किन्स विद्यापीठ
1830 पूर्व मॉन्युमेंट स्ट्रीट, 8028 अ
बॉल्टिमोर, मेरिलँड, यू०एस०ए०
ई-पत्ता dvaidyal@jhmi.edu

मी महात्मा गांधींचे 'सत्याचे प्रयोग' वाचल्यावर मला कळलं की त्यांच्यावर रस्किनच्या 'अन टू द लास्ट' या पुस्तकाचा खूप खोलवर प्रभाव पडला होता. पंधरा वर्षं नाना खटपटी करून मी रस्किनचं पुस्तक मिळवून ते वाचलं. नम्रपणानं सांगतो की माझी घोर निराशा झाली. परंतु या अनुभवातून मला एक गोष्ट लक्षात आली ती अशी की तुम्हाला पुस्तक काय सांगतं यापेक्षाही तुम्ही कुठली मन:स्थिती घेऊन पुस्तकाकडं जाता हीच बाब अधिक मौलिक असते.

- रवींद्र किंबहुने, 'आपले वाङ्मयवृत्त', ऑगस्ट २०१०, पृष्ठ ७





अनुक्रमणिका

# बोलींच्या अभ्यासाविषयी

कैलास सार्वेकर

संदर्भ : 'भाषा आणि जीवन' २८:३/पावसाळा २०१० या अंकातील माझ्या 'बोली : समाज, साहित्य आणि संस्कृती' या पुस्तकाचे परीक्षण.

परीक्षण लेखात प्रसिद्ध झालेल्या महत्त्वपूर्ण सूचनांचे स्वागतच आहे. तथापि काही गोष्टींचा खुलासा होणे अगत्याचे आहे म्हणून हा लेखनप्रपंच.

१. आदिवासी विद्यार्थ्यांमधील भाषेच्या न्यूनगंडाबद्दल 'त्या विद्यार्थ्यांच्या प्रतिक्रियांवरून असे दिसते की, भाषेच्या लेखीपणाचाच धसका बोलीकांना जास्त बसतो.' असे खैरे म्हणतात. वस्तुस्थिती मात्र जरा वेगळी आहे. लिहिण्यापेक्षा उच्चारणाची अडचण या बोलीभाषकांत अधिक आहे. संदर्भित लेखात सविस्तर सोदाहरण चर्चा आहे आणि त्यावरील उपाययोजना आणि विद्यार्थ्यांच्या प्रतिक्रियाही दिलेल्या आहेत.

२. जामनेरी बोलीवरील लेखात संयुक्त स्वरांची संधी होते असे म्हणून त्यासाठी औत > आउत ही प्रक्रिया दिलेली आहे. येथील 'संयुक्त स्वर संधी' हा संकल्पनाबंध अयोग हे मान्य. त्याऐवजी 'उच्चारसुलभीकरणाकडे बोलींचा कल असतो' असे म्हणावयास हवे होते.

३. अहिराणी-गुजराती विषयक लेखासंदर्भात 'बोलीविषयक लेखात इतिहास-संस्कृती इ० अनेक बाबींना स्पर्श करणे टाळले पाहिजे.' असे परीक्षण म्हणते. डॉ० ना०गो० कालेलकर यांच्या 'भाषा: इतिहास आणि भूगोल' या पुस्तकात हे घटक बोलीवर कसे प्रभाव करत असतात यासंबंधीचे विवेचन आहे. सयाजीरावांची मायबोली अहिराणी व कार्यबोली दक्षिण गुजराती होती. त्यामुळे त्यांच्या कार्याचा प्रभाव अप्रत्यक्षरित्या या बोलीसंबंधावरही झाला असे प्रस्तुत अभ्यासकाचे मत आहे. तसेच 'अहिराणीने मराठीकडून जशा काही गोष्टी घेतल्या तशा गुजरातीकडूनही घेतल्या; किंबहुना गुजरातीकडून अधिक घेतल्या' हे विधान खैरे यांना अतिव्याप्त वाटते. या संदर्भात बोलीविषयक पुरेशी समर्पक उदाहरणे देता येतील.

४. कोकणी या बोलीसाठी खैऱ्यांनी 'कोंकणी' असा शब्द वापरला आहे. मूळ आदिवासी कोकणी बोली या निर्देशातील 'कोकणी'चे सानुनासिक उच्चारण नाही.

पुस्तकातही तसे रूप नाही. आदिवासी कोकणी व कोकणातील कोंकणी, या दोन भिन्न बोली आहेत.

५. पुस्तकाच्या प्रास्ताविकात जामनेरी बोली आपले वेगळेपण आणि स्वतंत्र अस्तित्व टिकवून आहे, असे म्हटले आहे व मुखपृष्ठावरील तक्त्यात मात्र जामनेर लेवा बोलीचा मुलुख म्हणून दाखविला आहे अशी विसंगती परीक्षणात दर्शविली आहे. जामनेरी बोली आपले वेगळेपण जपत असली तरी तिच्यावर लेवा बोलीचा प्रभाव अधिक असल्याने तक्त्यात तो मुलुख लेवामध्ये दाखविला आहे. मुळात भाषेच्या प्रदेशांची काटेकोर विभागणी दर्शविणे अवघड. शिवाय जामनेर हा लहानसा भूभाग स्वतंत्र दाखविणेही उचित वाटले नाही म्हणून असे झाले.

६. 'कृषिजीवनाशी संबंध सांगणाऱ्या अनंत म्हणी या बोलीत आहेत' हे विधान परीक्षकांना अतिशयोक्त वाटले. अर्थात अशा म्हणी दाखविता येणे शक्य आहे. पण तो स्वतंत्र लेखाचा विषय होईल.

खैऱ्यांसारख्या मान्यवरांनी वेळ देऊन पुस्तक वाचले, त्यातील जमेच्या बाजू सांगून पुढील लेखन-कार्यासाठी काही उपयुक्त सूचना केल्या, त्याबद्दल प्रस्तुत अभ्यासक त्यांचा सदैव ऋणी राहील.

■

स्थिरभाष : (0257) 225 1951, चलभाष : 094215 68959
ई-पत्ता : ksarvekar@gmail.com

प्रतिसाद ३

# 'एक राष्ट्र, एक भाषा' हे तत्त्व अशास्त्रीय

**गो०पु० देशपांडे**

आपल्या २०१० च्या पावसाळा अंकात तुम्ही श्री गाणार ह्यांचे एक भाष्य पानपूरक म्हणून छापले आहे. त्यांना नागपुरातील एका सभेत सोविएत कॉन्सल जनरल (कॉन्सुलेट जनरल नव्हे) ह्यांनी स्वभाषेचा आग्रह धरून आणि हिंदीचा वापर करून भाषण केले त्यावेळी इंग्रजीत बोललेल्या बर्धन ह्यांच्यासारख्या वक्त्यांच्या व एकूणच ''हिंदुस्थानावासीयांच्या श्रीमुखात मखमली मारली'' ह्याचा मनापासून आनंद झालेला दिसतो. राईलकर ह्यांनाही ते भाष्य आवडल्यामुळे त्यांनी

ते तुम्हाला धाडले आहे.

ह्या पानपूरकात भाषेबाबतचे गैरसमजच जास्त दिसतात. मुदलात एका राष्ट्र आणि एक भाषा हे समीकरण राजकीय आहे, भाषाशास्त्रीय नव्हे. रशियनांनी त्यांच्या देशात सगळ्यांच्या डोक्यावर रशियन मारली ह्याला राष्ट्रवाद म्हणायचे तर म्हणावे, पण रशियाचे विघटन का झाले ह्याचे तेही एक कारण आहे हे लक्षात ठेवावे. पाकिस्तानात उर्दूच्या आग्रहामुळे काय रामायण घडले त्याचे विस्मरण भारतीयांनी होऊ देऊ नये. विशेषत: महाराष्ट्रीय हिंदी-देशभक्तांनी तर ते अजिबात होऊ देऊ नये. इगोर बोनी साहेबास भारताची घटना ठाऊक नसावी ह्याचे नवल नाही पण ती मराठी मंडळींना नसावी ह्याचे नवल आहे. घटनेत सुदैवाने एकमेव राष्ट्रभाषेचा उल्लेख नाही. हिंदी आणि इंग्रजी दोन्ही भाषांचा 'लँग्वेजिज ऑफ ॲडमिनिस्ट्रेशन' (राज्यकारभाराच्या भाषा) असा उल्लेख आहे. एखाद्या राजकीय विचाराच्या आहारी जाऊन बोनी साहेबाच्या गोंधळाचे निष्कारण कौतुक करू नये. एका राष्ट्रभाषेच्या आग्रहापायी राष्ट्रच तोडणे हे प्रकार नवे नाहीत.

मुख्य म्हणजे ज्या बोनी साहेबाने हे आध्यात्म सांगितले त्याचा रशिया १९व्या शतकात फ्रेंच बोलणे बहुमानाचे मानत होता. त्याबाबतीत रशियनांना एखादी तरी 'मखमली' मारून मग त्यांचे गुण गायला गाणार मोकळे होतेच. पण ते त्यांच्याच्याने झाले नाही. 'जय हिंदी'च्या आनंदात ते तसे काही करायचे विसरले असावेत! स्वित्झर्लंडमध्ये चार भाषा 'राष्ट्रभाषा' आहेत. आपल्याकडेही अनेक भाषांना हे स्थान घटनेने दिले आहे. एक राष्ट्र, एक भाषा ह्या राजकीय भूमिकेतून हिंदी वगळता इतर भाषांचे 'राष्ट्रीयत्व' नाकारण्याचा हा उद्योग आहे. हिंदी वगळता इतर भाषांच्या 'श्रीमुखात' मारण्याचा हा अव्यापारेषु व्यापार करू नये. इंग्रजीचे म्हणाल तर जोवर घटनेने इंग्रजीला दिलेले स्थान बदलत नाही तोवर कुणाचेही इंग्रजी बोलण्याचे स्वातंत्र्य नाकारता येत नाही. लोकशाहीवर निष्ठा असलेले बहुभाषिक राज्य काय असते आणि त्याची राजकीय पथ्ये काय असतात ते स्तालिनच्या पठडीत तयार झालेल्यांना काय कळावे!

अर्थात तिथे मी असतो तर मराठीत बोललो असतो एवढे मात्र म्हणतो! आता मराठी भाषेचा असा राष्ट्रभाषा म्हणून आग्रह गाणार ह्यांना रुचेल की नाही ते मात्र सांगता येणे कठीण आहे.

■

बी 10, अथश्री, फेज 1, बाणेर, लिंक रोड,
पाषाण, पुणे 411 021
स्थिरभाष : (020) 2586 3256, चलभाष : 098906 87085

# महाराष्ट्र शासन, युनिकोड आणि इन्स्क्रिप्ट

विजय पाध्ये

जगभरात कॉम्प्युटरवर मराठीचा एक 'फाँट' वापरता येईल, असा 'युनिकोड' तयार करण्याचे काम ७० टक्के पूर्ण झाले आहे आणि बाकीचे ३० टक्के काम तीन महिन्यांत पूर्ण होईल अशी माहिती मा० मुख्यमंत्री अशोक चव्हाण ह्यांनी दिल्याची बातमी दै० 'सकाळ'च्या दि० २८ जुलै २०१० च्या अंकात प्रसिद्ध झाली आहे. ह्या बातमीमुळे मनात काही शंका निर्माण झाल्या. कारण, जगभरात वापरल्या जाणाऱ्या संगणकातील प्रचालन प्रणालीसोबत (ऑपरेटिंग सिस्टिम) मराठी टंकनासाठी लागणारा मंगल हा टंक गेली काही वर्षे तरी दिला जात आहे आणि वापरकर्ते त्या टंकाचा उपयोग करीत आहेतच. फक्त तो समाधानकारक नाही; त्या टंकात काही दोष व त्रुटी आहेत. (उदा० महाराष्ट्र शासनाने संमत केलेल्या वर्णमालेनुसार देठयुक्त 'श' व देठयुक्त 'ल' हे वर्ण उपलब्ध नसणे; 'अॅ', 'ऑ' सारख्या वर्णांमधील चंद्रकोरीचे चिन्ह खालच्या बाजूला कललेले असणे; 'क्क', 'व्व' सारख्या जोडवर्णांची मांडणी केवळ आडवीच करता येणे इ०) त्या दूर करणे ही प्राथमिक गरज आहे. आजही मराठीसाठी अनेक यूनिकोडानुकूल टंक उपलब्ध आहेत त्यात शासनाकडून तयार केला जात असलेल्या टंकाची भर पडेल एवढेच. (तो निर्दोष व आकर्षक असावा ही अपेक्षा!) तो टंक जगभर वापरल्या जाणाऱ्या संगणकांमध्ये उपलब्ध करून द्यायचा असेल तर तो प्रचालन प्रणालीसोबतच उपलब्ध होईल अशी व्यवस्था शासनाला करावी लागेल अथवा तो महाजालावरून विनामूल्य उपलब्ध करून द्यावा लागेल. त्यापेक्षा मायक्रोसॉफ्टद्वारे आधीपासून जगभर सर्वत्र उपलब्ध असलेल्या टंकात आवश्यक असणारी दुरुस्ती त्यांच्याकडूनच करून घेणे हे अधिक सुलभ व कमी वेळ खाणारे काम आहे आणि ते केवळ शासनालाच करता येणारे आहे.

युनिकोडचे महत्त्व आता बहुतांशी सर्वांना पटलेले आहे आणि अनेक वर्तमानपत्रेदेखील आता युनिकोडानुकूल टंकांचा वापर करूनच महाजालावरून उपलब्ध झाली आहेत. त्यामुळे इथल्या दैनंदिन बातम्या व इतर वाङ्मय जगभर कुठेही विनासायास वाचता येऊ लागले आहे.





अनुक्रमणिका

महाराष्ट्र शासन मात्र आपल्या संकेतस्थळासाठी युनिकोडानुकूल टंकाचा वापर का करीत नाही हे कोडेच आहे!

युनिकोडानुकूल टंकाचा वापर करणे जितके महत्त्वाचे आहे तितकेच इन्स्क्रिप्ट (इंडियन स्क्रिप्ट) कळफलकाचाच वापर अनिवार्य करणे हेही महत्त्वाचे आहे. इंग्रजी कळफलकाबाबत जगभरात बहुतांशी एकच वर्णरचना (क्वर्टी) योजली गेलेली असल्यामुळे टंकयंत्रे असोत वा संगणक, कळफलकाच्या वापरासंबंधाने कोणतीही अडचण न येता जगभर सर्व माणसे आपली कामे सुलभतेने करीत असतात. भारतीय भाषालिप्यांबाबत मात्र शासनाने प्रमाणीकरणाचा आग्रह न धरल्यामुळे, अनेक वर्षांपासून सर्व निर्माते 'जो जे वांछील तो ते लाहो' हे सूत्र वापरून बहुपर्यायी कळफलक देऊ लागले आणि त्यामुळे एकसूत्रतेच्या अभावी समस्या निर्माण झाल्या आहेत. अर्थात, केंद्र शासनाला ह्याची जाणीव झाल्यामुळे त्याच्यातर्फे सर्व राज्यांमध्ये इन्स्क्रिप्ट कळफलकाचाच वापर केला जावा म्हणून आदेश काढण्यात आलेला आहे, परंतु त्याची अंमलबजावणी मात्र केली जात असल्याचे दिसून येत नाही.

सी-डॅकने विकसित करून दिलेल्या ह्या इन्स्क्रिप्ट कळफलकामध्येही काही दोष वा त्रुटी आहेत. परंतु सी-डॅक ही आपलीच एक शासनप्रणीत संस्था असल्याने हे दोष निवारण करणे त्यांना सहज शक्य आहे.

तेव्हा, नवीन टंकाच्या निर्मितीऐवजी उपलब्ध असलेल्या टंकातील या सर्व भारतीय भाषालिप्यांसाठी उपयुक्त ठरेल असा जो एकच इन्स्क्रिप्ट कळफलक उपलब्ध करून देण्यात आलेला आहे त्या कळफलकातील दोष दूर करून त्यांचा आग्रहपूर्वक वापर करणे हे गरजेचे आहे आणि त्यासाठी महाराष्ट्र शासनाचे पाठबळ आवश्यक आहे.

■

4 चित्रा 'बी', विद्यासागर सोसायटी,
बिबवेवाडी, पुणे 411 037.
स्थिरभाष : (020) 2441 1951
चलभाष : 098220 31963





अनुक्रमणिका

# १४वी वार्षिक सर्वसाधारण सभा, २००९-२०१०

रंजना फडके

मराठी अभ्यास परिषदेची १४ वी वार्षिक सर्वसाधारण सभा रविवार, २५ जुलै २०१० रोजी सायंकाळी ठीक ५.३० वाजता प्रा० प्र०ना० परांजपे यांच्या अध्यक्षतेखाली घेण्यात आली. विद्यार्थी साहाय्यक समितीच्या सुमित्रा सदन येथील सभागृहात ही सभा आयोजित करण्यात आली होती.

पुरेशा गणसंख्येअभावी सभा १५ मिनिटे तहकूब करण्यात आली. त्यानंतर सभेला प्रारंभ झाला. सर्वप्रथम २००९-२०१० या वर्षभरात कालवश झालेल्या ज्ञानपीठ पुस्कारप्राप्त विंदा करंदीकर, विद्यासागर महाजन, दि०पु० चित्रे, डॉ० माणिकराव धनपलवार, प्रा० ग०प्र० प्रधान, प्राचार्य शिवाजीराव भोसले, बाबा कदम, सुनीताबाई देशपांडे, चित्तरंजन कोल्हटकर, प्र०ई० सोनकांबळे, ज्योती बसू, श्रीपती शास्त्री, प्रा० लक्ष्मण देशपांडे, शांताराम नांदगावकर, पद्मविभूषण गंगूबाई हनगल, पं० भास्कर चंदावरकर, निळू फुले इ० कर्तृत्ववान आदरणीय व्यक्तींना श्रद्धांजली अर्पण करण्यात आली.

मागील वर्षाच्या १३व्या सर्वसाधारण सभेचे इतिवृत्त कार्यवाह आनंद काटीकर यांनी वाचून दाखविले. त्यामध्ये वर्षभर झालेल्या कार्यक्रमांची व अनौपचारिक बैठकांची माहिती देण्यात आली. त्यानंतर इतिवृत्त संमत करण्यात आले. सूचक होत्या डॉ० मृणालिनी शहा आणि अनुमोदक होत्या डॉ० नीलिमा गुंडी. यानंतर २००९-२०१० या वर्षाचे कार्यवृत्त वाचून संमत करण्यात आले. सूचक प्रा० रंजना फडके होत्या तर अनुमोदन डॉ० मनोहर जाधव यांनी दिले. कोषाध्यक्ष विजया चौधरी यांनी लेखापरीक्षकाने तपासलेले २००९-१० या आर्थिक वर्षाचे जमा-खर्च पत्रक व ताळेबंद सादर केला. तसेच २०१०-११ या आर्थिक वर्षाचा अर्थसंकल्प मांडला. या दोन्हीला सूचक म्हणून डॉ० कैलास सार्वेकर आणि अनुमोदक म्हणून श्री० सलील वाघ यांनी मंजुरी देणारे प्रस्ताव मांडले व सभेने ते संमत केले. २०१०-११ या आर्थिक वर्षाकरता आता कार्यरत असणाऱ्या लेखापरीक्षकांची व कायदेविषयक सल्लागारांची नेमणूक कायम ठेवावी असा ठराव डॉ० मृणालिनी शहा यांनी मांडला व श्री० विजय पाध्ये यांनी त्याला अनुमोदन दिले.

संस्थेच्या प्रगतीचा विचार करून संस्थेच्या घटनेत बदल करावा या दृष्टीने चर्चा करण्यात आली. त्यामध्ये खालील मुद्दे मांडण्यात आले.

१. पुण्याबाहेरील सभासद सभेला फारसे उपस्थित राहू शकत नाहीत. याचा विचार व्हावा.

२. कार्यकारिणीमध्ये असणाऱ्या सभासदांची संख्या वाढवावी.

३. आश्रयदाते, विश्वस्त अशी काही पदे निर्माण करावीत.

४. परराज्य, परदेश या ठिकाणी मराठी अभ्यास परिषदेचे प्रतिनिधी असतील अशी व्यवस्था करावी.

५. संस्थेच्या कार्यासाठी सहकार्यवाहांची संख्या वाढवून ती तीन करावी.

६. संस्थेच्या कार्याचे सातत्य टिकविण्यासाठी विद्यार्थी सभासद कार्यकारिणीत असावेत.

अशा मुद्द्यांचा विचार करून घटनेत नेमके कोणते बदल करावेत त्यासंबंधी शिफारस करण्यासाठी एक समिती नियुक्त करण्यात आली. त्यामध्ये प्रा० प्र०ना० परांजपे, डॉ० नीलिमा गुंडी, डॉ० मृणालिनी शहा, प्रा० आनंद काटीकर, यांचा समावेश असावा आणि समितीचे निमंत्रक म्हणून डॉ० मनोहर जाधव यांनी काम करावे असे ठरवण्यात आले.

यानंतर माननीय अध्यक्षांच्या परवानगीने आयत्या वेळच्या विषयांवर चर्चा झाली. पुणे विद्यापीठाच्या मराठी विभागाच्या सहकार्याने चर्चासत्र घेणे; त्यासाठी (१) कन्नड-मराठी वाद (२) महाराष्ट्र स्थापनेनंतर मराठी भाषेचा कितपत विकास झाला इ० विषय सुचवण्यात आले. चर्चासत्रात त्याचप्रमाणे विद्यापीठांत होणाऱ्या भाषिक अभ्यासाची माहिती मिळवावी, भाषाविषयक पुस्तकांची यादी करावी, असेही विचार या प्रसंगी चर्चेत आले. 'युनिकोड'चा प्रसार करण्यासाठी कार्यशाळा आयोजित करावी असेही ठरले. संस्थेच्या प्रसारासाठी सभासदांची व नियतकालिकाच्या वर्गणीदारांची संख्या वाढविणे, मुख्यमंत्र्यांच्या जनसंपर्क अधिकाऱ्यांची भेट घेणे या विषयांचीही चर्चा या प्रसंगी करण्यात आली.

आभारप्रदर्शन आणि चहापानाबरोबर सभा समाप्त झाली.

■

सायली, श्रीरंग सोसायटी, बिबवेवाडी, पुणे 411 037
चलभाष : 093710 91442

लेखक परिचय

- **देशपांडे, (डॉ०) गो०पु०** - एम०ए०, पीएच०डी०, दिल्ली येथील जवाहरलाल नेहरू विद्यापीठात चीनविषयक अध्ययनाचे प्राध्यापक म्हणून २००३मध्ये निवृत्त. राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय नियतकालिकांमधून चीनसंदर्भात विपुल राजकीय विषयांवरील लेखन प्रसिद्ध. 'चायनीज कल्चरल रेव्हल्यूशन' व 'चायना अँड इंडिया' ही दोन इंग्रजी पुस्तके, तसेच मराठीत 'उद्ध्वस्त धर्मशाळा', 'अंधारयात्रा', 'चाणक्य विष्णुगुप्त', 'सत्यशोधक', 'रस्ते' इत्यादींसह वैचारिक व राजकीय विषयांवरील एकूण दहा नाटके, 'नाटकी निबंध' व 'चर्चक निबंध' हे दोन निबंधसंग्रह आणि 'इत्यादी इत्यादी कविता' हा कवितासंग्रह प्रसिद्ध.
- **परांजपे** (डॉ०) जया : पुणे विद्यापीठाच्या हिंदी विभागातील निवृत्त प्रपाठक. हिंदी नाटकावर दोन पुस्तके प्रकाशित.
- **पातुरकर** (डॉ०) शुभांगी : 'मराठी मुक्तछंद' या विषयावर पीएच्.डी. त्याच शीर्षकाचे पुस्तक १९९९मध्ये प्रकाशित. पुस्तकाला ग्रंथोत्तेजक सभा (पुणे), विदर्भ साहित्य संघ (नागपूर) यांचा म०म०वा०वि० मिराशी पुरस्कार व विदर्भ संशोधन मंडळ (नागपूर) यांचा डॉ. बाळाजी पुरस्कार असे पुरस्कार. 'मंतरलेले दिवस' (२००३) हा ललितलेखांचा संग्रह प्रकाशित.
- **फडके** (डॉ०) रंजना : वाडिया महाविद्यालयात अध्यापन. कवयित्री. अनेक संस्थांमध्ये सहभाग.
- **बेलवलकर** (डॉ०) सुमन : पश्चिम विभागीय भाषा केंद्र (पुणे) येथे अमराठी विद्यार्थ्यांसाठी मराठीचे अध्यापन. तेथील प्राचार्यपदावरून निवृत्त. 'बेलभाषा' (भाषाविषयक स्फुटलेखन), 'मराठी शारदीयेच्या चंद्रकळा' (संपादन) व 'लीळाचरित्रातील समाजदर्शन' ही पुस्तके प्रकाशित.
- **भट-बेहरे**(डॉ०)अनघा : पीएच०डी० (रशियन), व्यावसायिक भाषांतरकार. पुणे विद्यापीठाच्या परकीय भाषा विभागात रशियन भाषेचे अध्यापन, २००६मध्ये प्रकाशित झालेल्या रशियन मराठी शब्दकोशाच्या निर्मितीत सहभाग. सध्या मराठी-रशियन-जर्मन अशा त्रैभाषिक कोशाचे काम चालू. 'केल्याने भाषांतर' ह्या त्रैमासिकाच्या सुरुवातीपासूनच्या संपादक
- **मंचरकर** (डॉ०) र० बा० : मध्ययुगीन मराठी वाङ्मय, नवे साहित्य प्रवाह, संशोधन, समीक्षा, कथनमीमांसा, वाङ्मयेतिहास, साहित्यिक भूगोल, भाषाविज्ञान, वाङ्मयाचे अध्यापन. राजकीय तत्त्वप्रणाली, शिक्षण आणि समाज, तौलनिक साहित्य या अभ्यासक्षेत्रांत ९ ग्रंथ, ४ सूत्रसंपादने, ८ संपादने आणि तीनशे शोधनिबंध; दोन राज्यपुरस्कार, तीन जीवनगौरव पुरस्कार आणि प्रतिष्ठित संस्थांचे ७० पुरस्कार.
- **मोहनी**, अनुराधा - मराठी वाङ्मय, लोकप्रशासन व संस्कृत वाङ्मय ह्या तीन विषयांमध्ये एम्.ए० याशिवाय कायदा व पत्रकारिता या विषयांतील पदवीधर. हिंदीची 'राष्ट्रभाषा पंडित' परीक्षा उत्तीर्ण. भाषा संचालनालयात मुख्यत: शब्दकोश व विधि अनुवाद ह्या शाखांमध्ये २१ वर्षे काम. साहायक भाषा संचालक ह्या पदावरून स्वेच्छानिवृत्त. 'भूमिसंपादन अधिनियम १८९४ - अर्थउकल' हा ग्रंथ प्रकाशित (मे २०१०); महाराष्ट्र शासनाचा उत्कृष्ट वाङ्मयनिर्मिती पुरस्कार.
- **मोहिते-बाबर** शरदिनी : एम०ए० (मराठी व संस्कृत). ६० नियतकालिकांत लेखन. समाज-शिक्षणमालेमध्ये साहित्य, इतिहास, भाषा, भूगोल, मानसशास्त्र ३० विषयांवरील पुस्तके प्रकाशित. बालांसाठी चार कादंबऱ्या. 'थर्ड वेव्ह' (ऑल्विन टॉफलर). 'देवदास' व 'परिणीता' (शरच्चंद्र चतर्जी) या पुस्तकांची भाषांतरे प्रकाशित.

